# विश्वसाहित्य

गेल्या सात वर्षांत ग. पा. परचुरे प्रकाशन मन्दिराचे वतीने एकंदर एकशें दहा मराठी पुस्तकें प्रसिद्धिण्यात आलीं. स्वभाषेतील ग्रंथांबरोबरच परदेशीय वाङ्मयाचाही परिचय मराठी वाचकांना व्हावा या हेतूने 'विश्वसाहित्य' या मालेंतून उत्तमोत्तम परदेशीय ग्रंथांची मराठी भाषान्तरें प्रसिद्ध करण्याचा उपक्रम आम्ही आरंभिला आहे. 'विश्वसाहित्य' मालेचें पहिले पुष्प नऊ अमेरिकन कथा 'धडधडतें काळीज' या नावानें आम्ही मराठी वाचकांचे हातीं देत आहों. नेहमीप्रमाणे मराठी वाचक आमच्या या नवीन उपक्रमाचेंही स्वागत करतील असा विश्वास आम्हाला वाटतो.

ग. पां. परचुरे

# १. धडधडतें काळीज

## ए ड ग र ॲ ल न पो

अमेरिकेतील एक महान् कथालेखक व कवि एडगर ॲलन पो (१८०९ ते १८४९) हे आधुनिक रहस्य-कथेचे आद्य जनक मानले जातात. तीव्र कल्पना-शीलतेतून जन्मलेल्या त्यांच्या कथांत रोमांचकारी संदेह (सस्पेन्स) भरपूर असतो. 'कुठल्याहि मर्त्य मानवाने जी स्वप्ने रचण्याचे कधी धाडस दाखविले नसेल अशी मौलिक स्वप्ने' त्यांनी उराशी बाळगली. मानवी आत्म्याच्या अंधाऱ्या तळघरांत जाऊन प्रत्येक गोष्टीचा कसून छडा लावू पाहणाऱ्या अत्यंत चित्तवेधक अशा कथांत त्यांनी या स्वप्नांना समूर्त केले

त्यांनी कांही भावनात्मक आणि वर्णनात्मक काव्येहि रचली. तशाच विनोद व साहसाच्याहि कथा त्यांच्या

चतुरस्र लेखणीतून स्फुरल्या. एकोणिसाव्या शतकांतील सर्व अमेरिकन लेखकात आज तेच अधिक लोकप्रिय आहेत.

त्याचे खाजगी जीवन अव्यवहारी व आततायी कृत्यानी आणि विकृतींनी भरलेले असले तरी त्याच्या लघुकथा व कविता मात्र अचूकपणा व मितभाषित्व याचा एक अद्भुत चमत्कार गणल्या जाव्यात. वास्तवता व काल्पनिकता याच्या आडव्या-उभ्या धाग्यानी विणलेल्या त्याच्या कथात त्यांचा प्रत्येक शब्द, प्रत्येक वाक्प्रचार नि त्याचे प्रत्येक वाक्य त्याना अभिप्रेत असलेला अंतिम परिणाम साधण्यास साहाय्यभूत होते.

'द टेल-टेल हार्ट' या मूळ नांवाने प्रसिद्ध असलेली त्याची ही अत्यंत लोकप्रिय कथा आहे.



होय, हे खरे की मनात काहूर माजले होते, अतिभयानक असे काहूर! आताहि माजले आहे. पण म्हणून तुम्ही मला माथेफिरू का ठरवावे? ज्या दुखण्यानं मी पछाडला गेलो होतो, त्याने माझ्या संवेदनांना धार आणली होती— त्या संवेदना नष्ट झाल्या नव्हत्या की बोथटहि झाल्या नव्हत्या. मुख्य म्हणजे माझी श्रवणेंद्रिये मोठी तिखट बनली होती. स्वर्ग-धरेवरच्या साऱ्या गोष्टी माझ्या कानी येत नरकातले विलापहि मला ऐकू येत मग माझे डोके फिरले आहे, असे कुणाला कसे म्हणता येईल? जरा दम धरा! जे काही झाले त्याची साद्यंत कहाणी मी किती निरोगी मनाने, किती स्थिर वृत्तीने तुम्हाला सांगतो ते तुम्ही स्वतःच पाहा म्हणजे झाले

हा विचार माझ्या डोक्यात मूळ कुठून शिरला ते मला सांगता यायचे नाही पण एवढे खरे की एकदा त्याचा शिरकाव होताच अहोरात्र पिशाच्चाप्रमाणे तो माझ्या मानगुटीला बसला. कसले उद्दिष्ट साधायचे होते का! कसलेहि नाही माझ्यावर कसल्या विचारांचा पगडा बसला होता म्हणता काय? तसेहि नव्हते. तो म्हातारा खरोखरच मला आवडायचा. त्याने काहीहि वाकडे केले नव्हते माझा अपमान केला नव्हता. त्याच्या सोन्याअडक्याची मला इच्छा नव्हती मग?

मला वाटते, तो त्याचा डोळा असावा होय, तोच तो! त्याच्या एका डोळ्यात गिधाडाची नजर होती त्या डोळ्यात फिकट निळी झाक होती, व त्यावर एकप्रकारचे झिरझिरीत पटल पसरले होते. जेव्हा जेव्हा त्याची ती दृष्टि माझ्यावर खिळून राही तेव्हा तेव्हा माझे रक्त गोठू लागे. तेव्हा क्रमाक्रमाने, धीरेधीरेच मी त्या निर्णयापाशी आलो. म्हाताऱ्याचा जीव घ्यायचा व अशा रीतीने कायमची त्याच्या त्या नजरेतून सुटका करून घ्यायची!

खरा मुद्दा काय आहे हे आले तुमच्या लक्षात? त्याचे असे आहे— तुम्हाला वाटते, माझे डोके ठिकाणावर नाही. आता वेड्या माणसांना काहीहि कळत नसते, हे तर खरे ना? पण तुम्ही मला पाहायला हवे होतेत किती चातुर्याने, केवढ्या सावधगिरीने, किती अचूक दूरदृष्टीने मी पावले टाकली ते तुम्ही पाहायला पाहिजे होते. केवढ्या धूर्ततेने मी

कामाला लागलो! मी त्या म्हाताऱ्याचा खून केला त्याच्या आधीच्या आठवड्यात मी जितक्या प्रेमळपणानें त्याच्याशी वागलो तितक्या प्रेमळ-पणानें पूर्वी कधीहि वागलो नव्हतो. आणि दर रात्री, प्रहर मध्यरात्री, मी हळूच त्याच्या दाराची खिळी सरकवी व त्याचे दार उघडी किती हळू--? अगदी अलगद मग माझे डोकें दाराच्या फटीतून आत घालता येईल इतकें ते दार किलकिलें आलें की एक बंद दिवा मी आत सरकवी. बंद! म्हणजे पेटवलेल्या दिव्याचा एक अस्पष्टसा किरणसुद्धा बाहेर दिसणार नाही इतका कडेकोट बंद. दिवा आत सरकावला की मी माझें डोकें आत खुपसी.

किती कावेबाजपणाने मी डोकें आत घाली हे तुम्ही पाहिले असतेत तर तुम्हाला हसू आल्यावाचून राहिले नसतें. अगदी हळू मी डोकें आत शिरकावी --हळू म्हणजे किती हळू! म्हाताऱ्याची झोप चळू नये म्हणून ही दक्षता. त्याला बिछान्यावर झोपलेला जिथून नीट पाहता येईल तियपर्यंत डोकें आत न्यायला तब्बल एक तास लागे! हं! वेडा मनुष्य इतक्या शहाणपणाने कधी वागेल काय? खोलीत एकदा व्यवस्थितपणें डोकें खुपसलें की, अतिशय सावधगिरीनें - किती कमालीच्या सावधगिरीनें म्हणाल? अहो, दाराची बिजागरेसुद्धा करकरायची --मी दिव्याची झडप किलकिली करायचा. त्या गिधाडी नजरेवर फक्त एकच बारीकसा किरण पडेल इतकीच किलकिली अन हे असे सतत सात रात्री चालले होते बरोबर प्रहर मध्यरात्री पण तो डोळा नेहमी मिटलेलाच दिसायचा. अर्थात् माझें मनोगत तडीस नेणे कसे शक्य होतें? कारण मला जाच व्हायचा तो त्या म्हाताऱ्याचा नव्हता, तर त्याच्या त्या दुष्ट डोळ्याचा. असे असूनहि दर दिवशी उजाडताच मी धीटपणानें त्या म्हाताऱ्याकडे जायचो आणि त्याच्याशी धैर्यानें बोलायचाहि. हार्दिक स्वरानें त्याला हाक मारून रात्री त्याला झोप वगैरे कशी काय लागली ते मी विचारीत असे. अर्थात् दररोज रात्री बरोबर बाराच्या ठोक्याला तो निद्राधीन असता त्याच्यावर मी का पाळत ठेवावी असा संशय घ्यायचा झाल्यास म्हातारा एक गंभीर मनाचा पुरुष होता असेच म्हणावे लागेल.

आठव्या रात्री त्याच्या घराचा दरवाजा उघडताना मी नेहमीपेक्षा

अधिक सावधगिरी बाळगली. एखाद्याच्या घड्याळाचा मिनिटकाटा-देखील माझ्या हातापेक्षा अधिक जलद काम करतो माझ्या स्वतःच्या शक्तीचा, माझ्यातील धूर्ततेचा मला त्या दिवशा जसा प्रत्यय आला तसा यापूर्वी कधीच आला नव्हता 'जित मया' चा भावनावेग आवरून धरणे मला किती कठीण वाटत होते!

मी हळूहळू त्याचे दार उघडता आहे आणि माझ्या गुप्त मनोदयाचा वा कृत्याचा त्याला मात्र स्वप्नातसुद्धा सुगावा लागू नये! हा विचार मनात येताच मला हसू आले त्याला ते एकू गेले की काय कुणास ठाऊक! कारण एकदम दचकल्याप्रमाणे बिछान्यातच तो एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळला आता त्या क्षणी मी घाबरून कच खाल्ली असेल असे जर तुम्हाला वाटत असेल तर ते चूक आहे त्याच्या खोलीत गुडुप अंधार होता. अगदी काळोख किर्र! (चोराच्या भयाने आपल्या दारा खिडक्यांच्या झडपा तो अगदी घट्ट लावून घेई ) अर्थात् दरवाजाची फट त्याच्या लक्षात यायची नाही, हे मला ठाऊकच होते. त्यामुळे धीरे धीरे मी दार जास्त जास्त उघडले

मी नुकतेच डोके आत घातले होते. अन् आता मी त्या दिव्याची झडप उघडणार तोच त्याच्या पत्र्याच्या कडीवरून नकळत माझा आंगठा खाली सरकला. तत्क्षणी 'कोण आहे तिकडे - कोण आहे?' असे ओरडत म्हातारा ताडकन बिछान्यात उठून बसला

मी हू का चू केले नाही. अगदी स्तब्ध राहिलो. संपूर्ण तासभर मी असा स्तब्ध होतो माझा एक स्नायूदेखील हलला नाही. दरम्यान तो पुनः बिछान्यावर लवडला असावा असेहि काही चिन्ह दिसले नाही. अजून तो आपल्या बिछान्यात निरखट कानाने कानोसा घेत होता.

इतक्यात मला कण्हण्याचा आवाज ऐकू आला. प्राणांतिक भयातून हे कण्हणे निर्माण झाले होते, हे काय सांगायला हवे? त्या कण्हण्यात व्यथा किंवा दुःख नव्हते नाही नाही -- असले त्यात काहीहि नव्हते एखादा मनुष्य कुठल्या तरी गोष्टीने दिपून गेला म्हणजे त्याच्या आत्म्याच्या गाभाऱ्यातून जो दसका, गुदमरल्यासारखा नाद घुमतो तसे ते कण्हणे होते. माझ्या चांगल्या परिचयाचा हा आवाज होता. कारण अनेक रात्री, ऐन

मध्यरात्रीच्या क्षणाला, माझ्या स्वतःच्या हृदयातून हा आवाज फुटला आहे आणि दर वेळी त्या आवाजाने आपल्या भीषण प्रतिध्वनीने, माझ्यावर ज्या भीतीचा पगडा बसलेला असे ती भीति अधिक तीव्र बनलेली आहे. त्यामुळें म्हाताऱ्याला त्या क्षणी काय वाटत होतं ते मला चटकन् कळले अन् मनातून मला त्याची कीव आली. माझा अंतरात्मा मात्र त्या क्षणीं तृप्तीनें हसत होता. ऐकला न् ऐकलासा तो पहिला आवाज आला न् तो कुशीवर वळला. तेव्हापासून तो जागा होता. मला हे पुरे ठाऊक होतें. तेव्हापासून क्षणाक्षणाला त्याची भीति वाढत होती. अकारण आपण हा भीतीचा बागुलबोवा आपल्या मनात निर्मीत आहोत असें तेव्हापासून तो स्वतःला परोपरीने पटवून देऊ पाहात होता. पण त्याला तें वळत नव्हतं. 'धुराड्यातून वाऱ्याचीहि झुळूक आत आली असावी—' असे तो म्हणत असला पाहिजे. किंवा, 'काय ही शिंच्या उंदराची खडबड!' अथवा 'झाडात अपरात्री पाखरू ओरडल असणार—' असे काही तरी तो सारखा मनाशी म्हणत असावा. होय! अशा मनाशी एक ना दोन अनेक शंका काढून तो स्वतःचे समाधान करू पाहात होता. पण व्यर्थ! सारे निष्फळ! कारण मृत्यूने प्रत्यक्ष त्याच्यावर झडप घालण्यापूर्वी आपल्या छायेने आधीच त्याचे टिपण साधले होते व अशा रीतीनें आपला बळी पूर्णपणे आपल्या कह्यात आणला होता. या अबोध सावलीच्या शोककारक प्रभावामुळेच—प्रत्यक्षात त्याला काही दिसत वा ऐकू येत नसले तरी—मी खोलीत डोकावलो आहे ही गोष्ट त्याला जाणवली असावी.

अशा रीतीने मी किती वेळ मोठ्या धीराने वाट पाहिली. पण तो पुनः बिछान्यावर कलंडल्याचे कानावर आले नाही. अखेरीस दिव्याची बारीकशी, अगदी बारीकशीच फट उघडण्याचा मी निर्णय घेतला. किती चोरहातानीं मीं ती उघडली असेल, तुम्हाला कल्पना नाही यायची. कोळ्याच्या जाळ्याच्या ततूसारखा एक अंधुकसाच किरण त्यातून बाहेर पडला व तो त्या गृध्रदृष्टीवर खिळला.

त्याचा हा डोळा उघडा होता. अगदी सताड उघडा. तो पाहून माझा संताप अगदी शिंगला पोंचला. अगदी स्पष्टपणे मला तो दिसत होता,

फिक्कट निळा. त्यावर रक्त गोठवून टाकणारा तो हिडिस, विरविरीत पडदा. पण डोळा सोडला तर म्हाताऱ्याची मुद्रा किंवा त्याची देहयष्टि यापैकी मात्र मला काहीहि दिसत नव्हते. कारण जणू सहजपेरणेने, नेमक्या त्या नतद्रष्ट डोळ्यावर मी दिव्यातून अचूकपणे किरणसंधान साधले होते.

तुम्ही ज्याला माथेफिरूपणा म्हणाल ती इंद्रियांची तीव्र संवेदनशीलता होती असे मी प्रारंभी म्हणालो ना? तेच खरे. कापसात गुंडाळून ठेवलेले घड्याळ जसे बद्‌बद्, चपळ ठोके देते तसा एक आवाज आता माझ्या कानावर पडू लागला. हा आवाज माझ्या चांगला परिचयाचा होता. म्हाताऱ्याच्या काळजातली ही धडधड होती.

पडघमच्या आवाजाबरोबर सैनिकाला स्फूर्ति मिळून, तो आपल्या पराक्रमाची शर्थ करतो, तसा माझा क्रोध त्या आवाजाने अधिक पेटला.

पण असे असूनहि मी स्वतःला आवरून धरले नि स्तब्ध राहिलो. मी धड श्वासहि घेत नव्हतो. माझ्या हातातला दिवाहि निश्चल होता. किती स्थिरतेने मला तो किरण त्याच्या डोळ्यावर पाडता येतो ते पाहायचे होते. दरम्यान त्याच्या काळजातल्या नरकयातना पुनः ऐकू येऊ लागल्या. क्षणाक्षणाला तो आवाज अधिकाधिक जलद व अधिकाधिक मोठा होऊ लागला. म्हाताऱ्याची भयाने गाळण उडाली असावी. काय सांगू? तो आवाज प्रतिक्षणी मोठा होत होता मी काय म्हणतो हे तुम्हाला कळले काय? माझ्या मनात काहूर माजले होते हे मी तुम्हाला सांगितलेच होय, तसेच माझे झाले आहे. मध्यरात्रीच्या अश्राप घटकेला. त्या जीर्ण घरातील भीषण शांततेत या अनोळखी आवाजाने मी अगदी पुरता भेदरून गेलो. तरीसुद्धा आणखी काही मिनिटे मी स्वतःला आवरून अगदी स्तब्ध राहिलो. पण ती धडधड उलट वाढूच लागली. आता याचा ऊर फुटणार की काय असे मला वाटले. इतक्यात एक नवीनच चिंता माझे मन पोखरू लागली. न जाणो! हा आवाज कुणी शेजाऱ्याने ऐकला तर! म्हाताऱ्याची घटका भरलीच होती. दिव्याची झडप काढून टाकून ठणठणीत प्रकाशात मी ओरडतच आत उडी मारली. त्याने फक्त एकच किंकाळी मारली. व एकच! क्षणार्धात खसकन् ते धूड जमिनीवर ओढून त्यावर मी त्याचाच जड बिछाना टाकून दिला. आतापर्यंत पार पाडलेल्या कृत्याच्या समाधानाने मी स्वतःशीच हसलो. पण

त्यानंतर किती तरी मिनिटे घुसमटलेल्या आवाजात काळीज धडधडत होते पण आता त्याचा विचार तितकासा तापदायक वाटला नाही. कारण मला माहीत होते की भिंतीच्या पलीकडे काही हा आवाज जायचा नाही शेवटी तो थांबला एकदाचा म्हातारा मृत होऊन पडला होता. त्याच्यावरचा बिछाना काढून टाकून मी त्या प्रेताचे निरीक्षण करू लागलो होय! अगदी दगडासारखा निश्चल मढे होऊन तो पडलेला होता बराच वेळ त्याच्या छातीवर हात ठेऊन मी ठोके मोजू लागलो. नाडीची कसलीहि हालचाल नव्हती. अगदी दगडासारखे प्रेत झाले होते त्या देहाचे. आता त्याच्या डोळ्याचा मला कसलाहि जाच होणार नव्हता.

इतक्याउपरहि जर तुम्हाला मी माथेफिरू वाटत असेन, तर या प्रेताची विल्हेवाट लावण्यासाठी मी कसकशी खबरदारी घेतली ते तुम्हाला सांगतो. ते सांगितल्यानंतर तरी तुम्ही खात्रीने आपले मत बदलाल. रात्र संपत असल्याने मी अगदी घाईघाईने सारे उरकून घेत होतो. अगदी गुपचुप. प्रथम सोयीच्या दृष्टीने मी प्रेताचे तुकडे केले. नि पायातळच्या जमिनीच्या तीन फळ्या काढून घेऊन ते सगळे मी त्या खबदाडात भरून टाकले अन् पुन्हा त्या फळ्या अशा कौशल्याने तिथे बसवून ठेवल्या की, कुठल्याहि मानवी डोळ्याला—त्याच्यासुद्धा—त्या फळ्या काढल्या असाव्यात असा संशयसुद्धा येणार नाही. कुठेहि रक्ताचा थेंबसुद्धा सांडला नव्हता.

माझे सारे कार्य मी आटोपले तेव्हा पहाटेचे चार वाजले होते. अजून मध्यरात्रीसारखाच गुडुप अंधार होता. इतक्यात घड्याळाने तासाचा ठोका दिला हे काय- रस्त्याकडल्या दरवाजावर कुणी ठकठक करीत आहे काय? मी ते दार उघडायला गेलो. माझे मन प्रसन्न होते. मला घाबरण्याचे कारण काय? तीन माणसे आत शिरली. आपण पोलिसातून आलो असल्याचे त्यांनी सौजन्याने सांगितले त्याचे असे झाले होते की, रात्री कुणाला तरी किंकाळी ऐकू आली होती आणि इथे काही तरी काळेबेरे असावे असा संशय येऊन त्याने पोलिसात वर्दी दिली होती. अर्थात् पोलिसखात्याने तलास करण्यासाठी या अधिकाऱ्यांना पाठवून दिले होते.

मी स्मितपूर्वक त्याचे स्वागत केले. होय! मला भिण्याचे कारणच काय? मी त्याना सागून टाकले की मीच झोपत किंकाळी मारली होती. म्हातारा आतेरगावी गेला होता. मी माझ्या पाहुण्याना सबंध घरभर फिरवले, इतकेच काय पण त्याना नीट झडतीहि घ्यायला लावली. शेवटी त्याना मी त्याच्या खोलीत नेले. तिथे त्याच्या साऱ्या वस्तू जगाच्या तगा असल्याचे त्याना पटवून दिले आत्मविश्वासाच्या भरात मोठ्या उत्साहाने मी त्या खोलीत खुर्च्या आणल्या व त्याना आराम करायलाहि सागितले. पण माझ्या बिनतोड विजयाच्या गर्वमदात जिथे मी त्या प्रेताचे तुकडे गडप केले होते तिथेच नेमक्या त्या फळ्यावर मी माझी खुर्ची ठेवली.

त्या अधिकाऱ्याचे सशयनिरसन होऊन त्याचे पूर्ण समाधान झाले होते हे काय सागायला हवे? माझ्या वागणुकीने त्याची पूर्ण खातरजमा झाली होती त्याच्या प्रश्नाना मी प्रसन्न मुद्रेने उत्तर देत होतो. त्यामुळे क्रमाक्रमाने तेहि परिचयाच्या गोष्टीवर मनमोकळेपणे बोलू लागले. पण का कोण जाणे! माझा चेहरा पडू लागला ही पीडा आता जाईल तर बरे असे सारखे वाटू लागले माझ्या डोक्यात कुणीतरी घणाचे घाव घालीत होते. कानात घणघण घटा वाजत होत्या पण ते मात्र तसेच बसून होते. तसेच इकडल्या तिकडल्या गप्पा मारीत होते. हळूहळू माझ्या कानातला आवाज स्पष्ट होऊ लागला त्या आवाजाच्या जाणिवेवर मात करण्यासाठी मी अधिक मोकळेपणाने बोलू लागलो पण तो आवाज कसला थाबतो? उलट त्याला निश्चित, सुस्पष्ट आकार येऊ लागला. अन अखेरीस असा क्षण आला की, हा आवाज माझ्या कानात होत नसून त्याचा उगम दुसरीकडे कुठे तरी होत आहे ह मला कळून चुकले.

ही जाणीव होताच माझा चेहरा साफ पडला असला पाहिजे यात शका नाही. पण माझे बोलणे आता अस्खलित वाटू लागले. माझा आवाजहि चढू लागला. तरीसुद्धा तो दुसरा आवाज वाढत होता. तो थोपवून धरण्या साठी मला काहीहि करता येत नव्हते. तो आवाज अगदी मद होता. कानाला बद लागत होता पण त्यात चपळाई होती कापसात गुडाळलेल्या घड्याळाचा असाच आवाज होतो. माझा श्वास अडखळू लागला आणि तरीहि यापैकी काहीहि त्या अधिकाऱ्याच्या गावी नव्हते. मी अधिक घाईने, अधिक

उतावीळपणाने व कळकळीने बोलू लागलो. चढ्या आवाजात, जोरजोरानें हातवारे करून मी बारीकसारीक गोष्टींचा कीस काढण्यास सुरुवात केली, पण व्यर्थ. तो नाद उलटा वाढतच होता. हे लोक जात का नाहींत? त्यानी सारे काही हेरले असावे अशी माझी भावना बळावत चालली आणि मनाच्या त्या प्रक्षुब्ध अवस्थेतच मी दाणदाण पाय आपटीत खोलीत येरझाऱ्या घालू लागलो त्या नादाला खंड नव्हता. देवा, काय ही अवस्था आणलीस? माझ्या तोंडाला जणू फेस येत होता. मी शिव्याशाप वाहत होतो. ज्या खुर्चीवर मी बसलो ती खुर्ची आता मी उगाचच करकर करीत पायाखालच्या त्या लाकडी जमिनीवर घासली. नाद सारखा वाढतच होता. पण ते लोक आपले मजेत हसत गप्पा मारीत होते. का त्याना काहीच ऐकू येत नव्हते? हाय रे परमेश्वरा!....नाहीं नाही. असे कसे होईल? त्यानी ऐकलेच असले पाहिजे. खास त्याना काहीं तरी सशय आला त्याना काही तरी कळले. माझ्या भीतीचाच ते फक्त उपहास करीत होते. निदान मला तरी असे वाटले—आताहि वाटते. या यातनेपेक्षा काहीहि पुरवले असते. या उपहासापेक्षा काहीहि मला सुसह्य वाटले असते. त्याचे ते दांभिक हास्य यापुढे मला अगदी सहन होईना. किंचाळावें . .मरावे .काय वाटेल ते करावे पण हे नको! असे वाटले . पुनः पाहा. पुन्हा तो नाद वाढत चालला.

मी एकदम किंचाळलो, "दुष्टानो, पुरे पुरे! तुमचा बनाव नाही सहन होत मला. तुम्हाला कबुलीजबाबच हवा आहे ना? हा घ्या! त्या फळ्या काढा. इथे इथे त्याच्या त्या हिडिस काळजाची ही धडपड ऐकू येते आहे."

♤ ♤ ♤

# २. बिनशिराचा घोडेस्वार

## वॉ शिं ग्ट न  आ य र्विं ग

आतरराष्ट्रीय मानमान्यता मिळालेले वॉशिंग्टन आयर्विंग (१७८३–१८५९) हे पहिले अमेरिकन साहित्यिक होत. निबधकार, इतिहासकार व कथालेखक अशा विविध भूमिकानी ते तळपले. 'सल्मागुडी' या नावाच्या, व्यक्तिरेखा आणि कथा यानी भरलेल्या त्याच्या ग्रथखडावरून व न्यू यॉर्कचा त्यानी जो इतिहास लिहिला त्यावरून त्याच्या सृजनशील वाङ्मयीन गुणाची सर्वांना प्रचीति आली.

त्याचे निबंध आणि कथा यात लेखकाची स्वतत्र विनोदबुद्धि, अगभूत गोडवा आणि सुस्वभावी वृत्ति यांचा चागला प्रत्यय येतो. तथाकथित कुणा एका 'निकरबॉकर'ने लिहिलेला त्याचा न्यू यॉर्कचा इतिहास

म्हणजे त्याच्या विनोदाचा एक अप्रतिम नमुना आहे. या निकरबॉकर दंतकथेला आता अमेरिकेच्या राष्ट्रीय परंपरेत स्थान प्राप्त झाले आहे 'स्केच बुक' हे त्याचे पुस्तक तर फारच लोकप्रिय आहे 'स्लीपी हॉलो'ची दंतकथा त्यातलीच रिप व्हॅन विंकलची अप्रतिम स्वभावरेखा कुणाला माहीत नाही? ही कथाहि 'स्केच बुक'मध्येच आहे

वॉशिंग्टन आयर्विंग पुष्कळ वर्षे अमेरिकेच्या राजनैतिक खात्यात होते त्यामुळे त्याचा प्रवासहि पुष्कळ झाला. या कथेतील इकेबॉड क्रेनने, विन-शिराच्या स्वाराच्या हातावर ज्या ठिकाणी तुरी दिली असा समज आहे त्याच्याजवळच, म्हणजे स्लीपी हॉलोतील कबरस्थानातच, वॉशिंग्टन आयर्विंगनी अखेरची चिरविश्रांति घेतली.



डच खलाश्यांनी ज्याला टॅप्पन झी असे नाव दिले त्या हडसन नदीच्या विस्तीर्ण पात्रापाशी पूर्व किनाऱ्यावर एक लहानसे खोरे आहे. खोरे कसले, जमिनीची चिंचोळी माडीच तिथे दुमडून पडली आहे म्हणानात. उंच डोंगराच्या पुढ्यात असलेल्या या भूभागात नितांत शांतता माहेरी आल्यासारखी वाटते. जगाच्या व्यापातून आणि मोहजाळातून अंग काढून घेऊन एखाद्या निवांत स्थळी मला जर आराम करावयाचा असता व चिंतनात स्वानंदमग्न होऊन, शेष आयुष्याच्या तापत्रयातून मुक्त व्हायचे असते तर, मला नाही वाटत यापेक्षा आशादायक स्थळ मला हुडकून काढता आले असते.

या स्थळाभोवती एक प्रकारचे सुस्त विश्रब्धतेचे वातावरण पसरले आहे. यामुळे व जे पहिले डच वसाहतवाले येथे आले त्यांच्या वंशजात भिनलेल्या पिढीजात स्वभाव-छटांच्या काही विशिष्ट रसायनामुळे या एकांतवासातील प्रदेशाला 'स्लीपी हॉलो' (निद्राधीन तळभूमि) असे नाव पडले आहे या सबंध भूमीवर एकप्रकारची पेंगूळ, कसली तरी स्वप्निल धुंदी आल्यासारखे, किंबहुना तेथले सबंध वातावरण त्याने भारल्यासारखे वाटते. येथील सबंध जनतेच्या मनाला कसली तरी भुरळ पाडणारे, या लोकांना चालता बोलताना एका विचारचक्रात फिरायला लावणारे चेटूक कुणीतरी केले होते यात काही शंका नाही.

पण या विभागाला पछाडणारे दुसरेच एक भूत आहे घोड्यावर बसलेल्या एका बिनशिराच्या माणसाचे पिशाच्च येथे दिसते. अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धात, कुठल्या तरी अज्ञात लढाईत तोफेच्या तोंडी ज्याचे शिर उडाले असले पाहिजे अशा हेसियन सैनिकाचे हे पिशाच्च असावे असे काहीजण सांगतात. रात्रीच्या वेळी आपल्या या शिराच्या शोधार्थ हे पिशाच्च वायुवेगाने घोड्यावरून दौडत जात असलेले तिथले लोक पहात असतात. या भ्रममूलक दंतकथेचे सर्वसाधारण स्वरूप हे असे आहे. अर्थात् या सावल्यांच्या प्रदेशात अनेक कल्पनाशील कथांना या दंतकथेने जन्म द्यावा यात आश्चर्य कसले? 'स्लीपी हॉलोचा बिनशिराचा घोडेस्वार' या नावाने हे पिशाच्च आसपासच्या प्रदेशातील माणसांच्या परिचयाचे झाले आहे.

येथेच अमेरिकन इतिहासाच्या एका दूरच्या कालात इकॅबॉड क्रेन या नावाचा एक मनुष्य राहायचा आसपासच्या प्रदेशातील मुलाना शिकवण्या साठी तो येथे आला—किंवा त्याच्याच भाषेत सागायचे तर त्याने 'पथारी' पसरली. त्याचे क्रेन (करकोचा) हे नाव तरी किती सार्थ होते! तो उच तर होताच, पण अतिशय क्षीणहि. त्याचे खादे अरुद होते, आणि हातपाय लाब होते. हे ध्यान असे विचित्र होते की, बाह्या-पासून त्याचे हात मैलभर लाब लाबत असल्यासारखे वाटत पाय तरी काय? माती भरायचे खोरे असते तसे. विसविशीत, शिथिल असा त्याच्या या सबध देहयष्टीचा अवतार होता डोके लहानसेच व टाळूवर चपटे, कान भले मोठे, डोळे हिरव्या काचेच्या मण्यासारखे, आणि नाक लाब वाऱ्याची दिशा दाखविणाऱ्या पवन कावळ्यासारखे ह नाक होते. भणभणणाऱ्या वाऱ्यात तो एखाद्या डोंगरपठारावरून चालला आहे, त्याच्या देहामागून त्याचे कपडे भाल्यासारखे फुगताहेत फडफडताहेत, असे जर त्याचे ध्यान तुम्ही पाहिले असतेत तर एखाद्या मक्याच्या शेतातले हे बुजगावणेच पळत आहे की काय असे तुम्हाला वाटले असते.

त्याची शाळा म्हणजे एकखणी बसकी लाकडी इमारत होती. जुन्या कॉपीबुकाच्या पानानी या शाळेच्या भिंतीतील खिडारे बुजविली होती. मात्र शाळेभोवतालची एकातवासाची जागा मोठी रमणीय होती हिरव्या-गार झाडीने आच्छादिलेल्या डोंगराच्या पायथ्याशीच तिचे आवार होते. आवाराच्या एका बाजूला एक ओढा खळाळत वाहत असे, दुसऱ्या बाजूला एक प्रचड बर्च वृक्ष उभा होता एखाद्या सुस्त उन्हाळ्याच्या दिवशी, मधाच्या मोहळातून मधमाशाच्या गुजनाचा आवाज ऐकू यावा तसा मुलाच्या घोकपट्टीचा आवाज तेथून कानावर पडे या आवाजात मधून मधून व्यत्यय येई तो फक्त मास्तराच्या गरजण्याचा. क्रेन गायन-मास्तरहि होता

आठवड्यातून एकदा त्याच्याकडे गाणे शिकण्यासाठी विद्यार्थी गोळा होत. कॅट्रिना व्हॅन टॅसल ही अशीच एक विद्यार्थिनी होती. एका श्रीमत डच शेतकऱ्याची ती एकुलती एक मुलगी. ही अष्टादशवर्षा नवयुवति अंगापिडाने एखाद्या पारव्यासारखी पुष्ट होती. आपल्या बापाच्या

बागतल्या पाच फळासारखा रसरशीत, मधुर नि गुबगुबीत कांत तिच्या गालावर पसरलेली दिसे. याप्रमाणे सौंदर्याबद्दल तर तिची ख्याति होतीच, पण तिच्या महत्त्वाकांक्षाबद्दलहि पण काही म्हटले तरी ती थोडीशी नखरेबाजच होती. आपले आकर्षणाचे जाळे दूरवर फेकता येण्यासाठी प्राचीन व अद्ययावत् अशा दोन्ही तऱ्हेच्या फॅशन्स तिने आपल्या पेहरावात आत्मसात् केल्या होत्या.

इकॅबॉट क्रेनसबंधी बोलायचे तर ते असे की, स्त्रिया पाहिल्या की तो पुरा पागल बने, पार विरघळून जाई अर्थात् तोंडाला पाणी आणणारा असा घास कुठला वेडा तोंडचा सोडून देईल? विशेषतः तिच्या बापाच्या भव्य प्रासादात जाऊन आल्यावर तरी असे कुणी केले नसते.

व्हॅन टॅसेलच्या घरभोवताली डोळे पोचतील तिथवर भरगच्च कुरणे पसरली होती शेतात गव्हाच्या लोंब्या आणि मक्याची ताटेच्या ताटे पिकली होती जिथे पाहावे तिथे समृद्धि ऑर्चर्डची झाडे तर लाल लाल फळभारानी नुसती लवली होती हे सारे पाहिल्यावर, ज्या रूपमदेला हे सारे बापाच्या मागून मिळणार होते तिच्या ध्यासाने इकॅबॉड क्रेनचे मन स्वाभाविकच वेडे झाले.

पण त्याच्या मार्गात अडचणी होत्या त्याचे काय? एका चंचलेच्या विक्षिप्तपणाने आणि छादिष्टपणाने भरलेल्या अंधारलेल्या तळघरातून त्याला वाट काढायला हवी होती शिवाय तिच्या इतर अनेक रक्तामासाच्या आपकानाहि त्याला तोंड देणे प्राप्त होते

अशा आपकातच ॲब्राहामचा - ब्रॉम व्हॅन ब्रन्ट या उच्च नावाने ओळखल्या जाणाऱ्या माणसाचा — समावेश केला पाहिजे आता हा इसम मोठा धसमुसळ्या आणि आरडाओरडा करणारा असा जहांबाज मनुष्य होता सामर्थ्य आणि कणखरपणा हे ब्रीद असलेल्या या प्रदेशाचा हा ब्रॉम व्हन ब्रन्ट अर्थातच लाडका होता. भीमासारखी देहयष्टि आणि ताकद त्याच्यात होती आणि म्हणूनच लोकानी त्याला 'ब्रॉम बोन्स' असे टोपणनाव ठेवले होते कुणाशी मारामारी नि लठ्ठालठ्ठी करण्याचा प्रसंग असो, कुणाची रेवडी उडविण्याचा असो, की कुणाची चेष्टा करण्याचा प्रसंग असो, ब्रॉम कधी मागं सरला नाही पण त्याच्या स्वभावात

दुष्टाव्यापेक्षा चेष्टेखोरपणाच अधिक होता. बाह्यतः तो कितीहि आडदांड वाटला तरी अंतर्यामी त्याच्या कृतीत विनोदाचीच फडफड असे.

अशा प्रतिस्पर्ध्याशी इकॅबॉडने सरळ उघड्या मैदानात दोन हात करणे ही गोष्ट शुद्ध वेडेपणाची ठरली असती. अर्थात् त्याने जरा दमाने व मनमिळाऊ वृत्तीनेच घोडे दामटण्याचं ठरविले. गायनमास्तर असल्याच्या मिषाने तो व्हॅन टॅसलच्या शेतीवाडीवर वारंवार जायचा. घरधनीण तिकडे घरकामात वा चरख्यावर सूत कातण्यात दंग असता व प्राजळ बाल्ट दुसरीकडे निवातपणे आपल्या चिलमीतून मनसोक्तपणे धुराचे फवारे सोडीत असता इकडे इकॅबॉड त्या प्रचंड एल्म वृक्षाखाली झऱ्याच्या बाजला आपला वादनसंभार घेऊन त्या मुलीबरोबर यायचा. किंवा संध्याकाळच्या वेळी तिच्याबरोबर तो नुसताच चक्कर मारायचा. प्रेमिकाच्या कूजनाला सायंकाळइतकी अनुरूप वेळ दुसरी कोणती असेल? याप्रमाणे इकॅबॉड क्रेन आपले पाय पसरीत असता ब्रोम ब्रोन्सची आस्था कमी होत चालली यात संशय नाही. हळूहळू त्या दोघातले भांडण विकोपाला जाऊन त्यातून प्राणांतिक संघर्ष निर्माण होणार अशी चिन्हे दिसू लागली. आपल्या गावढळ टारगटपणावर विसंबून प्रतिस्पर्ध्याचा फज्जा उडविणे इतकाच एक पर्याय ब्रोमपुढे उरला होता. आपल्या आडदांड घोडेस्वाराच्या डिमतीने त्याने इकॅबॉडच्या शांततामय प्रांतात डाके घालण्यास प्रारंभ केला. कुठे शाळेचे धुराडेच बंद करून इकॅबॉडच्या गावशाळेचा विचका कर तर कुठे रात्रीच्या शाळेवर डाका घाल, असे प्रकार सुरू झाले. पण हे काहीच नव्हे, यापेक्षाहि मनस्तापाच्या गोष्टी तो करीत आहे असे वाटायला लावण्याइतकी विचित्र परिस्थिति त्याने निर्माण केली. कॅट्रिनाच्या देखत, चारचौघात तो इकॅबॉडची फजिती करी. अशी संधि सापडली की तो ती मुळीच वाया दवडीत नसे. इतकेच काय पण इकॅबॉडला सतावण्यासाठी त्याने एक कुत्राहि शिकवून तयार केला. तो नेमका नको त्या वेळी भुंकून इकॅबॉड आपल्या शिष्येला गाणे शिकवीत असता त्याला बेजार करी.

याप्रमाणे गोष्टी घडत असता काही दिवस असे गेले की कुठल्याच प्रतिस्पर्धी पक्षावर त्याचा म्हणण्यासारखा बरावाईट परिणाम झाला नाही.

इतक्यात ..हिवाळ्यातल्या एका दुपारची गोष्ट. इकॅबॉड विचारमग्न अवस्थेत बसला असता कुणा तरी नोकराच्या आगमनाने तो अचानक ताळ्यावर आला. त्या दिवशी मिनहीर व्हॅन टॅसलच्या इथे एक मेजवानी होणार होती. त्या मेजवानीचं निमंत्रण घेऊन तो नोकर धावत धावत शाळेच्या फाटकातून आत शिरला होता.

आपल्या प्रेयसीपुढें आपणाला अस्सल रुबाबात मिरवता यावें म्हणून इकॅबॉडने कुणाकडून तरी एक घोडा मागून घेतला.

व्हॅन टॅसलच्या प्रासादातील दिवाणखान्यात पाऊल टाकताच आनंदाने उजळून निघालेल्या या वीरपुरुषाच्या समोर आकर्षणाचे केवढे विराट् विश्व उमललें त्याचे काय वर्णन करावें? लाल आणि पांढऱ्या रंगाची उधळण करणाऱ्या, पुष्ट उरोजाच्या व कमनीय बांध्याच्या रमणीची ही मोहिनी नव्हती. शिशिर ऋतूतील डच मिष्टान्नाच्या नानाविध स्वादांचे हें आकर्षक विश्व त्याच्यासमोर उमललें होतें. जवळ जवळ अवर्णनीय अशा नाना प्रकारच्या केक्सनी भरलेले डिश टेबलावर होते. अनुभवी डच गृहिणीनीच असल्या केक्स बनवाव्यात! इकॅबॉडला काही घाई नव्हती. प्रत्येक गोष्टीचा तो स्वस्थपणे स्वाद घेऊ लागला. थोड्या वेळाने पली-कडच्या नृत्यगृहातून संगीताचे स्राव झरू लागले आणि जो तो नाचायच्या तयारीने तिकडे जाण्यासाठी उठला.

इकॅबॉडचा गळा जसा चांगला होता तसा त्याला आपल्या नृत्य कौशल्याचाहि मोठा अभिमान वाटे. त्याचे सारे अवयव, त्याच्या शरीरातील शीर न् शीर नाचत होती. जणू काही नृत्यदेवच साक्षात् नाचत होता.

नृत्य संपताच इकॅबॉड वृद्ध व्हॅन टॅसलबरोबर गप्पात सामील झाला. टॅसलभोवती वयस्क, विवेकी माणसाचा गोतावळा जमला होता व हे सारे लोक जुन्या काळच्या गोष्टी रंगवून रंगवून आळवत होते. गप्पाच्या ओघात अड्डा 'स्लीपी हॉलो'मधील सर्वांच्याच चर्चेचा विषय झालेल्या त्या पिशाचाच्या अस्तित्वाकडे वळला. बिनशिराचा हा घोडेस्वार या प्रदेशात अलीकडे रात्रौ गस्त घालीत असल्याचे कुणी सांगितले. स्मशानभूमीतील कबरीत तो आपला घोडा बांधीत असल्याचेहि कुणी म्हणालें. हळूहळू

मेजवानी सपुष्टात येऊन, मडळी आपापल्या कुटुंबासहित गाडीघोडे घेऊन जथ्याजथ्यानी आपापल्या घरी जाण्यास निघाली. त्या गाड्याची रिप रिप किती तरी वेळ सथपणे डोगरदऱ्यातून निनादत होती. घोड्याच्या टापात स्त्रियाच्या हसण्याखिदळण्याचा आवाज मिसळे, तोहि त्या निःस्तब्ध वनगर्जातून घुमत घुमत कानावर येऊन आदळे. हे सारे आवाज क्रमा क्रमाने मदावत जाऊन वातावरणात पूर्णपणे विरून गले.

गावच्या रीतीला अनुसरून इकॅबॉड मात्र अजून त्या प्रासादातून बाहेर पडला नव्हता प्रेमिकाने सगळ्याच्या शेवटी थाबून आपल्या प्रेयसीशी निघण्यापूर्वी काही अतरीचे हितगुज करायचे अशी तिथली प्रथा होती. अर्थात् आपण आपल्या मार्गात बराच मोठा यशाचा टप्पा गाठला असल्याची इकॅबॉडची दृढ भावनाच यामागे होती.

पण कुठे काहीतरी चुकले असावे, तसे नसते तर तो इतक्या लवकर व अशा भकास बापुडवाण्या चेहऱ्याने बाहेर पडला नसता. या स्त्रिया .या स्त्रिया .खरोखर ! पोरगी इकॅबॉडला झुलवीत तर नसावी ! या बिचाऱ्या मास्तराला ती ह जे उत्तेजन देत होती ती त्याच्या प्रतिस्पर्ध्याच्या गळ्यात गळा घालण्यासाठी योजलेली हुलकावणी तर नसावी ? देव जाणे ! एवढी गोष्ट खरी की प्रेयसीचे हृदय जिकायला निघालेल्या प्रेमिकाचा तोरा त्याच्यात नव्हता. उलट कोंबडीचे खुराडे लुटायला निघालेल्या शेदाड शिपायासारखा तो दिसला.

भयाण रात्र झाली होती. काळोख गुप्प पसरला होता. याच वेळीं ते पिशाच्च आसपासच्या भागात फिरत असे. आणि आज अशा अश्राप घटकेलाच इकॅबॉड भरल्या हृदयाने अवमानित होऊन, एकटाच डोगर-पठार ओलाडीत घराकडे वळत होता. याच रस्त्याने तो दुपारी आला तेव्हा त्याचे हृदय कसे प्रसन्नतेने काठोकाठ भरून आले होते !

भूतपिशाच्चाच्या दुपारी ऐकलेल्या साऱ्या गोष्टी आता त्याला खायला उठल्या. रात्रीवर काळोखाची पुटे चढत होती. आकाशातील तारेहि अधारात खोल खोल बुडत जात असल्यासारखे वाटले आकाशातून दूर जाऊ लागले की काही काळ हे तारे मुळीच दिसेनासे होत. इकॅबॉडला आजच्याइतके कधीच एकाकी व उदास वाटले नसेल. तशात ज्या

स्थानाभोवती पिशाचाच्या गोष्टी गोळा झाल्या होत्या त्या स्थानाच्या नजीक तो आता येत होता.

सुमारे २०० यार्डांच्या पलीकडे रस्त्यातून नाला ओलांडून जावे लागे. विलीचे ग्वाजण या नावाने ओळखल्या जाणाऱ्या एका दाट चिखलाच्या, दलदलीच्या भागात हा नाला जाई, दाट झाडीची ही एक गुहाच होती म्हणानात. इकॅबॉड तिथून चालला असता त्याच्या संवेदनाशील कानावर कसला तरी आवाज आदळला. पुलाच्या बाजला कुणी तरी निशाचर पाण्यात उभा होता. नाल्याच्या एका कडेला, झाडाच्या काळ्याकुट्ट गर्ईत अजस्त्र, अस्ताव्यस्त, काळेभोर आणि प्रचंड उंच असे काही तरी त्याला दिसले. झाडातून साट नाही सूट नाही. उलट, या पांथिकाच्या नरडीचा घोट घेण्यासाठी त्या विपण्ण वातावरणात ते अजस्त्र सावज जणू दबा धरून बसले होते.

बिचारा मास्तर! भयाने त्याच्या अंगावर काटा उभा राहिला डोक्यावरचे केस ताठ आले. काय करायचे या परिस्थितींत? मागल्या पावली पळ काढणे तर त्याला अशक्यप्रायच होते आणि शिवाय, समजा असा पळायला वाव असताहि, तरी काय? भूतपिशाचाना तर वाऱ्याच्या पखावरहि आरूढ होता येते हे जर खरे असेल नि हे भूतच असेल तर मागे पळण्याचा प्रयत्न करूनहि आपला पाड कुठे लागता? अर्थात् बेदरकारपणाचा देखावा उभा करणे एवढाच एक पर्याय इकॅबॉडपुढे होता चाचरत, तोतऱ्या आवाजात त्याने विचारले.

"कोण कोण आहे तिकडे?" पलिकडून हू नाही का चू नाहीं. अधिक कातर आवाजाने त्याने फिरून तोच प्रश्न विचारला तरीसुद्धा उत्तर नाही. पुन्हा एकदा त्याने घोड्याला टाच मारली आणि डोळे बंद करून तो नकळत परमेश्वराचे स्तोत्र गाऊ लागला.

इतक्यात सावलीसारखे ते कांहीं तरी हलू लागले. त्याने प्रथम धडपड केली—नि नंतर झेप घातली—अन् रस्त्याच्या मधोमध येऊन ते उभे राहिले रात्र अंधारी आणि निराशेने ग्रासलेली असली तरी, ते अज्ञात काहीतरी काय असावे याचा आता अंधुक कानोसा घेता येणे शक्य झाले. तो एक प्रचंड उंचीचा घोडेस्वार असावा. त्याचा घोडाहि चांगला जवान अन् रंगाने काळा असावा.

मध्यरात्रीं आपल्या मार्गात येऊन उभा ठाकलेला हा अपरिचित सहकारी इकॅबॉडच्या मनासारखा असणे शक्यच नव्हते. हेसियन शिपायाचे हें अश्वारूढ पिशाच्च तर नसेल ना, असा एक विचार त्याच्या मनात चमकून गेला. अन् त्या क्षणीं आपण जणू ब्रॉम बोन्स असून त्याची आपली झटापट लागली आहे असाहि विचार त्याच्या मनात तरळला. त्याच विचारात घोडेस्वारला मागे टाकण्याच्या ईर्ष्येने इकॅबॉडने आपल्या घोड्याला टाच मारली. पण तेवढ्यात त्या अज्ञात माणसानेहि तितक्याच वेगानें आपला घोडा पुढे घातला. इकॅबॉडने एकदम लगाम ओढून धरला आणि त्या अज्ञात पुरुषाला चकविण्यासाठी आता तो पायीं चालू लागला.

पण पाहतो तो त्यानेहि तसेच केले. आता मात्र इकॅबॉडच्या काळजाचे भीतीने पाणी व्हायला लागले. फिरून त्याने मघाच्या स्तोत्राचे चरण घोळविण्याचा प्रयत्न केला. पण त्याच्या जिभेला कोरड पडली. जीभ टाळ्याला चिकटू लागली. या स्वाष्ट, अज्ञात साथीदारच्या विक्षिप्त मनोवृत्तीत व दुराग्रही मौनात कसली तरी गूढ व भीतिदायक गोष्ट दडून बसली होती.

हे भीतिदायक काय होतं ते कळून यायला वेळ लागला नाही. दोवे-जण उचवटा चढून वर आले. आकाशाच्या पार्श्वभूमीवर लपलेल्या त्या प्रचंड उंच घोडेस्वाराचे त्याला जे दर्शन झाले ते इतके भयानक होते की त्याची गाळणच उडाली. घोडेस्वाराला नुसतं धडच होते. त्याच्या शिराचा तर पत्ताच नव्हता. तसेच हे शिर त्याच्या खांद्यावर न राहता त्याने जिथे घोड्यावर माड ठोकली होती त्या जिनापाशीच लटकत असलेले पाहून तर इकॅबॉडची भीति अधिकच वाढली. भीतीपायीं तो इतका अगतिक झाला कीं, काही करून तेथून पळून जाण्यासाठी त्याने आपल्या घोड्यावर—गन-पॉवडरवर—लाथाबुक्क्याचा एकदम प्रखर वर्षाव केला. पण त्या पिशाचानें त्याला सहज मागे टाकले. आता दोघांचेहि घोडे भरधाव सुटले होते. झाडापेटातून, दगडगोटे उडवीत घोडे धावत होते आणि त्याच्या टापा-खाली ठिणग्या उडत होत्या. घोड्यावरून बेफाम पळत असता इकॅबॉडच्या क्षीण देहावरील कपडे सोसाट्याने फडफडत होते.

'स्लीपी हॉलो'कडे वळणाऱ्या रस्त्याकडे त्याचे घोडे येऊन पोचतात

न पोचतात तोच इकॅबॉडचा घोडा अंगात सैतान सचारल्यासारखा सरळ डाव्या बाजूला झुकून डोंगर-उतरणीवरून बेफाम धावत सुटला. आता हा रस्ता वाळवटी असून दोन फर्लांगपर्यंत झाडाच्या दाट रागातून जायचा व पुढें पिशाच्चाची माराची जागा म्हणून ठरलेल्या पुलापाशी येऊन मिळायचा. इथूनच पलीकडे हिरव्यागार उचवट्यावर पांढरे सफेत चर्च उभे असलेले दिसे.

ब्रॉम बोन्सचे ते प्रतिस्पर्धी पिशाच्च जिथे अचानक लुप्त झाले ती जागा आता त्याला आठवली. 'पुलापाशी जरी पोचलो तरी मिळवली!' असा त्याच्या मनात विचार आला. तितक्यात तो काळा अबलख वारू धापा टाकीत आपल्या अगदी जवळ येऊन ठेपला असल्याचा त्याला भास झाला. इकॅबॉडने फिरून आपल्या घोड्याला टाच मारली. अन् पाहता पाहता ते जनावर पुलावर येऊन ठेपले. पुलाच्या लाकडी सागाड्यावर त्याच्या टापाचा जणु गडगडाट झाला. गनपॉवडर पुलाच्या पलीकडे येऊन ठेपला होता. इकॅबॉडने मागे वळून पाहिले. रूढ समजुतीप्रमाणे हे पिशाच्च आता एकदम आगीचा भडका उडाल्यासारखे होऊन नाहीसे होते किंवा काय हे त्याला पाहायचे होते.

तितक्यात ते पिशाच्च रिकिबीतल्या रिकिबीतच ताठ उभे राहिल्याचे व आपलेच शिर प्रचंड वेगाने त्याच्या रोखाने फेकत असल्याचे इकॅबॉडला दिसून आले. या भयानक अस्त्राचा मारा चुकविण्याचा इकॅबॉडने शिकस्तीचा प्रयत्न केला. पण किती उशिरा? ते सरळ त्याच्या मस्तकावर येऊन दाणकन् आदळले, इतक्या जोराने की तो घोड्यावरून खालीं धुळींत कोलमडला. तितक्यात गनपॉवडर, तो काळा घोडा व ते पिशाच्च एखाद्या झंझावाताप्रमाणें त्याच्या दृष्टीपुढून नाहीसे झाले.

दुसऱ्या दिवशी सकाळीं गनपॉवडर आपल्या मालकाच्या कुरणात, फाटका-पाशीं स्वस्थपणे चरत असल्याचे लोकांनी पाहिले. पण त्या घोड्यावर जीन नव्हते आणि त्याच्या तोंडातला लगाम त्याच्या खुराखाली लोळत होता. न्याहारीच्या वेळेपर्यंत तर इकॅबॉडचा पत्ता नव्हताच, पण जेवणाची वेळ झाली तरीहि तो परतला नव्हता. तोपर्यंत शाळेत जमा झालेली मुले ओढ्याच्या काठानें रमत गमत फिरू लागली होती. मास्तर होते कुठे?

करून चौकशी सुरू झाली. बऱ्याच वेळाने त्याच्या खुणा सापडू लागल्या चर्चकडे जाणाऱ्या एका टोकाला धुळीने माखलेले घोड्यावरचे जीन लोकांना आढळले. धुळीत घोड्याच्या खुरांचेहि माग जागोजागी उमटले होते. घोडे बेफाम वेगात धावत गेले असले पाहिजेत पुलापर्यंत त्याच्या टापाचा छडा लागत होता त्यापलीकडे, ओढ्याच्या एका काठावर दुर्दैवी इकॅबॉडचे शिरस्त्राण पडलेले व बाजूला एक फुटलेला भोपळा पडला असल्याचे लोकांना आढळले तेथे पाणी खोल व काळेभोर होते

नंतरच्या रविवारी चर्चमध्ये लोक प्रार्थनेसाठी जमले असता या घटनेची खूप चर्चा झाली लोक आपापल्या परीने तर्कवितर्क लढवीत होते जिथे इकॅबॉडचे ते शिरस्त्राण व तो भोपळा आढळला तेथे बघे गोळा होत. आणि गावगप्पांना ऊत येई सार्‍या जुन्या दंतकथा उकरून काढून चालू घटनेशी त्याची काही संगति लागते की काय याचाहि लोकांनी विचार केला. आणि अखेरीस त्यांनी असा निष्कर्ष काढला की, त्या अश्वारूढ सैनिकाच्या पिशाच्चानेच इकॅबॉडचा निकाल लावला असावा.

मात्र ही गोष्ट खरी की, यानंतर कित्येक वर्षांनी, न्यूयॉर्कला आलेल्या व ही साहसाची कथा सांगणाऱ्या शेतकऱ्याने एक वेगळीच गोष्ट उजेडात आणली. त्याचा मथितार्थ इतकाच होता की इकॅबॉड अजून जिवंत असून काही प्रमाणात त्या पिशाच्चाच्या नि हॅन्स व्हॅन रिपरच्या दारुण भीतीमुळे व काही प्रमाणात आपल्या प्रेयसीच्या हातून घडलेल्या अवहेलनेमुळे तो दुसरीकडे दूर राहायला गेला होता. या नव्या जागी त्याने काही काळ शाळा चालविली व त्याचबरोबर वकिलीचाहि अभ्यास केला मागाहून तो वकील झाला, राजकारण करू लागला, निवडणुकीच्या मोहिमेतहि त्याने भाग घेतला. आणि अखेर टेन पाऊंड कोर्टाच्या न्यायाधीशाचेहि पद त्याने भूषविले. दरम्यान तो वृत्तपत्रातूनहि लिहीत असे

आपल्या प्रतिस्पर्ध्याचा काटा काढल्यानंतर ब्रॉम बोन्सहि म्हणे तरुण कॅट्रिनाबरोबर बोहल्यावर चढला मात्र नंतर जेव्हा जेव्हा इकॅबॉडची गोष्ट निघायची तेव्हा तेव्हा त्यातले काहीतरी इंगित ब्रॉमला माहीत असावे असा भाव त्याच्या चर्येवर उमटे असे सांगतात. भोपळ्याचा उल्लेख निघाला कीं तो अगदी खदखदून हसे. त्यामुळे तो सांगे त्यापेक्षा

त्याला त्या गोष्टीत अधिक काहीतरी माहीत असावे असा सर्वसाधारण लोकांचा ग्रह झाला होता

मात्र इकॅबॉडच्या मागून त्याची शाळाहि जीर्ण स्थितीत मोडकळीला आली. दुर्दैवी इकॅबॉडचे भूत तेथे वावरत असल्याचेहि लोक सांगतात

.. एकाद्या उन्हाळ्याच्या मध्याकाळी रमत गमत घरी परतणाऱ्या शेतकऱ्याच्या मुलाला ' स्लीपी हॉलो 'च्या नीरव शांततेत इकॅबॉडच्या तोंडून बाहेर पडणाऱ्या स्तोत्राचे खिन्न स्वर दूर घुमत असल्याचा भास कधीमधी होत असे.

♠ ♠ ♠

# ३. जिवंत समाधि

## नॅथॅनिअल हॉथॉर्न

नॅथॅनिअल हॉथॉर्न (१८०४ ते १८६४) या अमेरिकन लेखकाची ही एक साधी पण मनोज्ञ कथा आहे. 'स्कार्लेट लेटर' सारख्या काही कादंबऱ्याहि त्यांनी लिहिल्या. जगात भरलेला अतोनात दुष्टावा हॉथॉर्न याच्या संवेदनाशील मनाला बोचतो. पण त्यांतून मानवाचा उद्धार होणार असल्याचेहि स्वप्न त्याना पडत राहते. मनातील पापवासनांच्या भारानेच मानवाचे दुःख तुटणार फुटणार असल्याचे त्याना दिसते. हॉथॉर्न याच्या कथेचा एक विशेष हा की, त्यांतील पात्रांना त्याची सदसद्विवेकबुद्धि सारखी टोचणी देत राहते. पात्राच्या हृदयातील आकांक्षा पाहा. ही सामान्य माणसे खरी. तसेच ती माणसांच्या

जगापासून दूर आहेत हेहि खरे पण त्याच्यापैकी प्रत्येकातला 'माणूस' ती जिवंत गाडल्यानंतरहि प्रत्येकाच्या स्मृतीत जिवंत राहतो

"यज्ञी ज्यांनी देउनि निज शिर
घडिले मानवतेचे मंदिर
परी जयांच्या दहनभूमिवर
नाहि चिरा, नाही पणती
—तेथे कर माझे जुळती"

असे कवि बा. भ. बोरकर म्हणतात. ही कथा वाचल्यावर या कवीच्या हृदयात दडलेल्या खोल व्यथा, कृतज्ञता आणि गहिवर या तिन्ही भावनांचा वाचकाच्या मनातहि कल्लोळ माजेल.



शेकोटीतल्या आगीच्या ज्वाळा धुराड्यातून फुफाट करीत वर चढत होत्या आणि जाळ चांगला भडकला असल्याने सबंध खोलीभर त्याचा प्रकाश पसरला होता. डोंगरकपारीतून धावत येणाऱ्या नदीनाल्याबरोबर जे लाकडाचे ओंढके वाहत यायचे ते एकमेकावर रचून ही आग पेटविली होती. पाइन वृक्षाच्या सुक्या व सटसडीत फांद्या आणि प्रचंड वृक्षाच्या तळाशी साचलेल्या काटक्या या दोन्ही त्यात जळत होत्या.

सप्टेंबर महिन्यातली प्रहर रात्र झाली होती. सारे कुटुंब शेकोटीभोवती ऊब घेत बसले होते कुटुंबातला कर्तासवरता बाप व आई यांच्या मुखावर प्रसन्न आनंद ओसंडत होता, मुले हसत होती, मोठी मुलगी सतरा वर्षांची होती अन् या क्षणी सुखाची साक्षात् प्रतिमा होती घरातली म्हातारी, मुलांची आजी, शेकोटीजवळ मोक्याची जागा पकडून काहीसे विणीत बसली होती आणि तीहि सुखाच्या परिपक्वतेची, सुखाच्या वृद्धावस्थेची मूर्ति भासत होती.

सबंध न्यू इंग्लंडमधल्या अगदी ओसाड अशा या भागात त्यांना त्यांची जणू संजीवनीच सापडली होती. व्हाइट हिल्समधील या खिंडकीतून वर्षाचे बाराहि महिने झाबरा, तीक्ष्ण वारा वाहत असे हिवाळ्यात तर तो अगदी पुरा निर्दय बने. सॅकोच्या खोऱ्यात उतरण्यापूर्वी वादळाचे थैमान घालून संतापाचा सारा भर त्यांच्या झोपड्यावर तो उगवून घेई कडाक्याच्या थंडीचा आणि अत्यंत धोक्याचा असा हा भाग होता. त्यांच्या माथ्यावर मुळक्यासारखा पर्वताचा पहाड चढला होता रात्री बेरात्री त्याच्या कड्याची अंगे कोसळू लागत आणि डोंगर दगरी धडाधड खाली येऊन त्यांना स्तंभित करीत.

मुलीने नुकती काहीं चेष्टामस्करी केली वाटते. त्यामुळे वारा जेव्हा सरपटत आला नि त्या झोपडीसमोर क्षणभर थबकल्यासारखा होऊन तो खाली खोऱ्यात वळण्यापूर्वी ते पुढले दार जेव्हा विव्हल स्वरात किरकिरले तेव्हा घरातली सारीजणं हसत होती. सरावाचा आणि परिचयाचाच हा आवाज खरा. पण त्याने त्यांना क्षणभर, क्षणभरच खिन्न बनविले. परंतु तितक्यात कुणी पांथस्थाने पुढच्या दाराची खीळ सरकविल्याचे त्यांच्या लक्षात येताच त्यांच्या मुद्रांवर पुन्हा आनंद झळकला. मघापासून सगळे

जग डोक्यावर घेतल्यासारखे वारें भणभणत होते. त्याच्या भणभणण्यापुढें कुठली या प्रवाशाची पावलें ऐकू येणार? तो प्रवेश करीत असतानाच वाऱ्यानें विव्हल स्वर काढला व तें पुढे सरकले तेहि आक्रंदतच. या विलापात सगळे आवाज बुडून गेले असल्यास त्यात आश्चर्य कसले?

ही सर्व माणसे विजनवासात राहत असली तरी बाहेरच्या जगाशी त्यांचा दररोज संबंध येई. ते ज्या खिंडीत राहत ती नॉच या नावाने ओळखली जायची. या रोमांचक नॉचच्या एका बाजूला मेन राज्याची सीमा पसरली होती अन् दुसऱ्या बाजूला ग्रीन माउन्टन्स या नावाने ओळखली जाणारी पर्वतराजि आणि सेंट लॉरेन्सचा किनारा पसरला होता. या दोन्ही टोकांना जोडणारी नॉचची प्रचंड नाडी, तीतून वाहत असणाऱ्या अंतर्गत व्यापाराच्या रक्तप्रवाहाने जणू सारखी चालू असे. या प्रदेशातून नियमित प्रवास करणारी गाडी या झोपडीसमोर नेहमी उभी राहयची. डोंगरकपारीच्या पलिकडे जाण्यापूर्वी वा पलिकडल्या खोऱ्यातील पहिल्या घराशीं पोचण्यापूर्वी त्यल्या विजनवासातील एकांतामुळे आपण खचून जाऊ नये म्हणूनच की काय येणारा जाणारा वाटसरू झोपडीतील माणसांशी बोलल्यावाचून पुढे जातच नसे. त्यांच्याबरोबर त्यांचे कुणीहि दोस्त नसत. बरोबर असायचा तो त्यांचा नोकरवर्गच तेवढा. पोर्टलंडच्या बाजारपेठेत जाणारा एखाद्या गटाचा नायक तेथे रात्रीपुरता तळ ठोकी. कुणी ब्रह्मचारी असला तर नेहमीच्या झोपायच्या वेळेपलिकडे आणखी एक तासभर बसून निरोपाच्या वेळीं वनरमणीचे चोरटे चुंबनहि घेई. त्यामुळे बाहेरच्या पावलांचा जेव्हा जेव्हा आत आवाज ऐकू येई तेव्हा तेव्हा, कुणी तरी घरातलेच माणूस आल्याप्रमाणे झोपडीतले एकजात सारेजण आतुरतेने त्याला उत्थापन देत.

नुकते ज्याने पुढले दार उघडले तो एक तरुण मनुष्य होता. तिन्ही-साजा घनदाट जंगलातून निर्मनुष्य अशा वाटेनं एकाकीपणे प्रवास करणाऱ्या माणसाच्या मुद्रेवर जी एक प्रकारची उदासीनता आणि निराशा प्रतीत होते ती त्याच्या चेहऱ्यावर प्रथम दृग्गोचर झाली. पण मग, ज्या प्रेमळ आतिथ्याने त्याचे स्वागत झाले त्या स्वागतातील जिव्हाळा पाहून त्याची मुद्रा उजळल्यावाचून राहिली नाही. तो आत येताच म्हातारीनें

आपल्या झग्यानें खुर्चीवरची धूळ झटकली. आणि धाकटे मूल हात वर करून पुढे धावत गेले. त्या सर्वांना भेटण्यासाठी त्याचे हृदय उत्कठेने नुसते पुढे पुढे झेप घेत होते आणि ती मोठी मुलगी एकच कटाक्ष आणि स्मित . त्या कटाक्षाने आणि स्मिताने त्या दोघात कसले तरी निरागस जिव्हाळ्याचे नाते निर्माण झाले.

"वा:! काय झक्क आग पेटली आहे!" तो म्हणाला, "अशा प्रेमळ माणसाचे येथे कडे पडले असल्यामुळे तर या शेकोटीची खुमारी विशेषच वाढली आहे. माझे हातपाय तर असे बधिर होऊन गेले आहेत म्हणता! दोन भात्यातली नळी असावी तशी ही खिड आहे. तटक ब्रार्टलेटपासून या नळींतून माझ्या तोंडावर सोसाट्याच्या वाऱ्याचे असे काही झोत बसले आहेत म्हणाल की त्या मार्गाने मी पुरा थिजलो आहे."

त्याच्या ग्वाग्रावरील शिदोरीचे लहानसे गाठोडे काढून घेता घेता घरधन्याने विचारले, "म्हणजे, तुम्ही व्हरमॉटला चालला‍त काय?"

"हो. तेथून बर्लिग्टनला कूच. नि मग त्याहिपलिकडे जायचे आहे. खरें म्हणजे इथून क्लॉफर्ड्सच्या घरापर्यंत मजल मारण्याचा मी सकल्प केला होता. पण तुम्हाला माहीतच आहे अशा रस्त्याने मनुष्य कसा रेंगाळत चालतो ते. पण काहीं बिघडले नाही. जेव्हा मी पेटलेली शेकोटी नि तुमचे उत्साही चेहरे पाहिले तेव्हा मला तरी असेच वाटले की जणू खास माझ्यासाठीच ही आग पेटविली आहे, नि येथे माझ्या येण्याची वाट पाहात बसला आहात. तेव्हा आता येथेच बैठक मारतो झाले."

तरुण मोठा मनमोकळा होता. उबेसाठी त्याने आपली खुर्ची आगीच्या अधिक जवळ सरकवली. तेवढ्यात बाहेरून मोठमोठ्या पावलांचा आवाज यावा तसे काहीतरी ऐकू आले. मागल्या सुळक्यासारख्या पहाडावरून लाब लाब टागा टाकीत सरळ कुणी तरी धावत यावे व झोपडी ओलाडून जाताना पलिकडच्या कड्यावर दुसरे पाऊल टाकण्याच्या वेगाने उडी घ्यावी तसे वाटले. झोपडीतील कुटुबाने श्वास आवरून धरला. कारण हा कशाचा आवाज होता हे त्याना चागले माहीत होते. पाहुण्यानेहि कसल्यातरी अत:प्रेरणेने तसेच केले.

मालक म्हणाले, "आम्हाला अशा गिरिराजाचे विस्मरण घडेल अशी

या गिरिश्रेष्ठाला भीति वाटलेली दिसते. म्हणूनच त्यांनी हा दगड आमच्या रोखाने उगारला कधी कधी ते असेच आपले मस्तक हलवितात व आपण खाली येऊ अशी धमकी देतात पण आम्ही जुने शेजारी आहात. त्यामुळे सर्वसाधारणत. आमचे चागले सूत जमते गिरिराज खरोखरीच जरी खाली आले तरी जवळच आमचे एक खात्रीचे निवाऱ्याचे स्थान आहे ”

यानतर रात्रीची जेवणे झाली अस्वलाची सागोती होती तरुणाच्या उमद्या स्वभावामुळे झोपडीतील सर्वांनाच त्याने आपलेसे केले जणू तो त्यांच्याच पहाडी वंशातला होता तो मोटा अभिमानी पण वृत्तीने शालीन होता धनाढ्य आणि मोठेपणाची बिरुदे मिरविणारे लोक यान्यात तो मितभाषी असे आणि गर्वोद्धताच्या ताठ्याने वागे पण गरिबाच्या झोपडीच्या दारशी तो अवनतमस्तक होई व शेकोटीजवळ घरातल्या भावासारखा व मुलासारखा वागे.

नॉचमधील या कुटुबात त्याला जिव्हाळा दिसला, त्यात कळकळ होती साधेपणा होता. न्यू इग्लडचे चातुर्य आणि तेथील पर्वताची शिखरे नि दऱ्या नि त्या रोमहर्षक, साहसी निवासस्थानाचा उबरठा यामोवती विहरणारे पण त्यान्या जाणिवेतहि नसणारे काव्य याचाहि ठसा तेथे उमटला होता फार दूरवर तो चालत आला होता अगदी एकाकीपणे. किंबहुना त्याचे सबध जीवन हाच मुळी एक एकाकी असा पथ होता कारण त्याच्या स्वभावातील सावधानतेमुळे एरव्ही त्याचे जे सहकारी बनले असते अशा लोकान्याहिपासून त्याने स्वत.ला अलिप्त राखले. पण आजच्या रात्री कसल्या भविष्यदर्शी सहानुभूतीने त्याच्या मनाचा कब्जा घेतला होता कुणास ठाऊक! या सुसस्कृत व सुशिक्षित तरुणाला त्या साध्याभोळ्या पहाडी लोकापुढे आपले हृदय ओतावेसे वाटले आणि त्याच विश्वासाने आपल्या प्रश्नाना त्याना त्याने उत्तरे द्यावयास लाविली.

अत्यत उच्च पण सदिग्ध अशी महत्त्वाकाक्षा हे त्या तरुणाच्या स्वभावाचे रहस्य होते. अप्रसिद्ध जीवन त्याला पत्करले असते, पण आपल्या कबरीत विस्मृतीच्या गर्तेत पडून नष्ट होण्याला त्याची तयारी नव्हती त्याच्या अतरीच्या उत्कट आकाक्षेला आज आशेचे स्वरूप प्राप्त झाले होते, आणि दीर्घकाळ मनात घोळविलेल्या या आशेला निश्चिततेची

भार आली होती. ज्या वाटेने तो अज्ञातवासातून एकटाच चालला होता ती सबंध वाट कदाचित तो चालत असताना नसली तरी पुढे मागे त्याच्या कीर्तीच्या तेजात धवळून निघणार होती आज जो वर्तमानकाळ म्हणून ओळखला जातो त्या वर्तमानकाळाच्या विपण्णतेने भरलेल्या अंधारात भावी पिढ्या जेव्हा डोळे फाडफाडून पाहतील तेव्हा त्याच्या पदचिन्हाभोवताली त्याना दीप्ति पसरलेली दिसणार होती कमी दर्जाचे ऐश्वर्य वाऱ्यावर विरून गेल्यावर भावी पिढ्याना हेच तेवढे तेज दिसणार होते व ते पाहून त्या म्हणणार होत्या की या ठिकाणी एक प्रतिभाशाली पुरुष अज्ञातवासात जन्माला आला व अज्ञातवासातच मृत्यु पावला.

त्याच्या गालावर विलक्षण सुंदर प्रभा फाकली आणि डोळ्यात उत्साहाची गहिरी चमक आली तो सांगू लागला, "अजूनपर्यंत, अजूनपर्यंत तरी मीं काहीहि केलेले नाही. उद्या जर मी पृथ्वीतलावरून नष्ट झालो तर कुणीतरी अज्ञात तरुण एका तिन्हीसाजा साकोऱ्याच्या खोऱ्यातून आपल्या इथे आला, त्याने आपले सारे हृदय इथे ओतले, दुसऱ्या दिवशी पहाटे नॉचच्या खिंडीतून आला तसा पलिकडे गेला नि नंतर कधी कधी पुनः दिसला नाही, ही तुम्हाला जितकी माहिती असेल तितकीसुद्धा कुणाला नसेल. 'हा कोण होता, नि हा वाटसरू गेला तरी कुठे' असे कुणी चुकूनसुद्धा विचारणार नाही. पण नाही नियतीने मला नेमून दिलेली कामे पार पाडल्याखेरीज मला मरायचे नाही. तसे झाले की मग खुशाल मरण येवो ते येण्यापूर्वीच मी माझा कीर्तिस्तंभ उभारलेला असेल."

त्याच्या भावनांचा उमाळा जबरदस्त होता. विस्कळित आत्मचिंतनातून हा भावनांचा प्रवाह वाहत होता. त्यामुळे सर्वांना अपरिचित असूनसुद्धा त्यामागील भावना त्याना कळू शकल्या परंतु आपले बोलणे हास्यास्पद होत आहे अशी त्याला चटकन जाणीव झाली आणि आपल्या उत्साहातिरेकाची त्याची त्यालाच लाज वाटली.

मोठ्या मुलीचा हात नकळत आपल्या हातात घेऊन स्वतःशीच मोठ्याने हसत तो म्हणाला, "तुम्ही मला हसता आहात. वॉशिंग्टन पर्वताच्या शिखरावर मी एकदम थिजून जावे व आसपासच्या लोकानी जणू मला त्या गोठलेल्या अवस्थेत पाहात राहावे तशासारखी काहीतरी

मूर्खपणाची महत्त्वाकांक्षा मीं उराशी बाळगली आहे असे तुम्हाला वाटेल. पण खरोखरच मानवाच्या पुतळ्याला असा उदात्त चबुतरा जर मिळाला तर काय बहार होईल!"

"का? या शेकोटीच्या जवळ बसून कालक्रमणा करण्यात काय कमी सुख नि समाधान आहे? आपल्याविषयी कुणीहि विचार करीत नसतील. न का करीनात? बिघडले कुठे?" मुलीने लाजत लाजत उत्तर दिलें.

वडील क्षणकाल विचारमग्न झाल्यासारखे दिसले. ते म्हणाले, "मला वाटतें हे तरुण जे काही म्हणतात त्यात काहीच अनैसर्गिक नाही. स्वतः माझ्या मनाचा जर त्याच्यासारखा कल असता, तर मलाहि तसेच वाटलें असतें." मग आपल्या पत्नीकडे पाहून ते म्हणाले, "खरेच मोठा चमत्कार आहे. मला ठाऊक आहे की, काही गोष्टींची पूर्ति कधीच होत नाही. पण याच्या या बोलण्यामुळे माझें मन मात्र सारखें याच गोष्टी-भोवती रुंजी घालू लागले आहे."

"का पुऱ्या होणार नाहीत? कदाचित् हे मनोरथ सफल होतीलहि. विधुर झाल्यावर तुम्ही काय कराल याचा तर तुम्ही विचार चालविलेला नाही?" पत्नीनें विचारलें.

"छे, छे! भलतच काय बोलतेस?" वडिलाच्या बोलण्यात राग होता. पण त्यात प्रीतीचेहि आर्जव होतें. "तुझ्या मनात असे येते तरी कसे, ईस्थर? तुझ्या मृत्यूचा मी जेव्हा विचार करतो तेव्हा माझाहि मृत्यु माझ्या डोळ्यासमोर उभा राहतो. मी विचार करीत होतो तो असा कीं बार्टलेट किंवा बेथेलहेम किंवा लिटलटन यासारख्या व्हाइट माउन्टन्सच्या सभोवतालच्या एखाद्या शहरात—ते आमच्या डोक्यावर चढून बसतील तिथे नव्हे ह—जर आपली शेतवाडी असती तर किती बरे झाले असते! शेजाऱ्याशी मला गुण्यागोविंदाने नांदावसे वाटते. त्यानी माझी प्रतिष्ठितासारखी सरबराई करावी आणि जनरल कोर्टात माझ्याकडेच वकीलपत्र द्यावें असेहि मला वाटतें. खरेच, काय हरकत आहे? मनुष्य दिलाचा सच्चा असला तर वकिलालाच काय एवढे लागून गेले आहे? अन् मी जेव्हा वृद्ध होईन नि अर्थात् तूहि—तेव्हा मी बिछान्यातच सुखानें श्वास सोडीन. मग तू अश्रूंचे नुसते पूर वाहवशील. माझ्या कबरीचा दगड

संगमरवरीच असावा असा माझा हट्ट नाही. साधा काळा दगडहि चालेल. त्यावर माझे फक्त नाव नि वय असावे. आणि नाही म्हणायला, जिवतपणीं मी प्रामाणिकपणे आयुष्य घालविले नि मरताना मी ख्रिश्चन म्हणूनच मेलो हे लोकाना कळावे म्हणून त्यावर एखादा श्लोक कोरलेला असावा. बस्स."

"म्हणजे पाहा, स्मारक असावें असे प्रत्येकालाच वाटते. मग ते साधे काळ्या दगडाचे असो, सगमरवरी असो, ग्रॅनाइट दगडाच्या स्मृति-स्तभाच्या स्वरूपात उभारलेले असो की मानवाच्या हृदयात कोरून ठेवलेल्या चिरतन ऐश्वर्यशाली स्मृतीच्या स्वरूपातले असो." त्या तरुणाने आश्चर्याने हे उद्‌गार काढले होते.

घरधनिणीच्या नेत्रात अश्रू आले. ती म्हणाली, "आज, काय झाले आहे तरी काय?" मग तिने मुलाना हाक मारली.

लहान मुलाना पलिकडल्या खोलीत या पूर्वीच हलविण्यात आले होते. पण त्या खोलीचा दरवाजा उघडाच होता. त्यामुळे ती अजून आपापसात बोलत बसली असल्याचे चागले ऐकू येई. शेकोटीपाशी बसलेल्या मोठ्या माणसाचा ससर्ग त्यानाहि झाला असावा. त्याच्याहि मोठमोठ्या कल्पना होत्या. आपण मोठी झालो की काय काय करू यासबधी त्याच्याहि बालमनात योजना रुजत होत्या. अखेरीला त्यातल्या एका लहान मुलाने भावडाशी बोलता बोलता आपल्या आईकडे रोख वळविला नि तो म्हणाला, "आई ग, आपण काय करायचे ठाऊक आहे? तू बाबा नि आजी नि आम्ही सगळेजण—हे पाहुणेसुद्धा—आपण सगळ्यानी मिळून आत्ताच्या आत्ता फ्ल्यूमच्या पाणवठ्यापाशी जाऊ या नि तिथले पाणी पिऊ या."

या रात्रीच्या वेळी चागली ऊबदार शय्या नि त्याहूनहि उबदार अशी शेकोटीतली आग सोडून पळत पळत फ्ल्यूमच्या पाणवठ्यापाशी जायचें व तेथले पाणी प्यायचे या त्याच्या बालिश कल्पनेचे सर्वाना हसू आल्या वाचून राहिले नाही. फ्ल्यूमच्या तिथे डोगराच्या कड्यावरून एक स्वच्छसा झरा कोसळत वाहत यायचा. त्या मुलाने आपली कल्पना बोलून दाखविली नाही तोच दाराशी गाडी खडखडत आल्याचा आवाज ऐकू आला. त्यात

दोनतीनच माणसे असावीत. कुठल्या तरी गाण्याच्या ध्रुपदाची टीप आपल्या ओबडधोबड गळयात त्यानी उचलून धरली होती व अशा रीतीने ती आपली मने उत्तेजित करीत होते. गाडी अशीच पुढे न्यायची की रात्रीपुरता त्या झोपडीत मुक्काम टाकायचा याचा ते मनाशी निश्चय करीत असता तुटक स्वरात त्याच्या गीताचे शब्द कडेकपाऱ्यातून आसमतात घुमले.

"बाबा, तुमच्या नावाने तुम्हाला ते हाका मारताहेत वाटते," मुलाने सुचविले.

पण त्यानी स्वरोखरच आपणाला साद घातली होती किंवा काय याची त्या सदाचरणी पित्याला मात्र मनाशी जबर शंका होती. फायद्याची आशा मनात बाळगून आगंतुकपणे त्याना आपल्या घरात बोलवायला त्यांचे मन काही धजेना त्यामुळे त्यानी होऊन दरवाज्याकडे जाण्याची घाई केली नाही. आणि जेव्हा त्यानी दरवाज्याची कडी काढली तेव्हा ते बाहेरचे वाटसरू नाचऱ्या गुडुप अंधारात दिसेनासेहि झाले होते. मात्र डोंगरातून त्याच्या गाण्याचे व हसण्याखिदळण्याचे स्वर एकाकीपणे घुमत होते.

लहान मुलगा उतावीळपणे म्हणाला, "आई, बघ की ग! त्या लोकानी आपणाला गाडीतून फत्यूमला नेले असते"

रात्रीच्या या भ्रमतीची त्याच्या मनात रुजलेली ही धीट कल्पना ऐकून पुन: एकदा त्याना हसू आले. पण तितक्यात काय झाले कुणास ठाऊक? मोठ्या मुलीच्या मनावर कसले तरी मळभ येऊन गेले शेकोटीतल्या आगीच्या ज्वाळाकडे ती गंभीरपणे पाहत होती. मध्येच निश्वास टाकल्यासारखा तिने श्वास सोडला. आपल्या मनातील उमाळा तिला दाबून धरायचा होता पण बांध फुटलाच मग ती उठली, लाजलीहि. भोवतालच्या माणसाना जणू आपल्या हृदयातले काही गुपित कळले असावे अशा भीतीने तिने त्यांच्याकडे कटाक्ष टाकला. तिच्या मनात इतका कशाचा विचार चालला आहे असे त्या तरुण पाहुण्याने विचारलेसुद्धा.

खालच्या मानेनेच स्मित झळकवीत ती उत्तरली, "कुठे काय? काही नाही! मला जरा एकटे एकटे वाटले, इतकेच."

अर्धवट गांभीर्याने तो म्हणाला, "पाहा, दुसऱ्याच्या मनातले मर्म

मला अचूक ओळखता येते की नाही, सांगा. तुमची रहस्यें मी सांगू! एखादी तरुण मुलगी जेव्हा ऊबदार अशा शेकोटीपाशीहि कांपू लागते आणि आई कुशीशी असूनसुद्धा जेव्हा तिला एकटें एकटें वाटतें तेव्हा त्याचा अर्थ काय करायचा हे मला चांगले माहीत आहे. तो अर्थ शब्दात सांगू का? ''

"या भावना जर शब्दात मांडता आल्या असत्या तर त्या मनातील भावना नव्हेतच मुळी," पर्वतातील ती अप्सरा उत्तरली. असे सांगताना ती हसत होती पण, पाहुण्याच्या डोळ्याला डोळा भिडवण्याचे मात्र तिला धैर्य होत नव्हते पण या सर्व हालचालीत एक प्रकारचे औदासीन्य होते त्या दोघांच्याहि हृदयात प्रीतीचे बीज अंकुरित होत होते असे असेल कदाचित् हे बीज इतके शुद्ध नि सात्त्विक होते की ते पृथ्वीवर उगवणार नसून जणू नंदनवनातच फुलणार होते त्यांच्या प्रतिष्ठेला सौजन्याची एक सुंदर किनार होती अशी प्रतिष्ठा हे सच्च स्त्रियांचे पूजास्थान असते आणि स्वाभिमानी, चिंतनशील पण प्रेमळ असे जे पुरुष असतात त्यांनाहि तिच्यासारख्यांच्या स्वभावातील निरागसपणा पुष्कळदा भुरळ घालीत असतो

मृदु आवाजात त्यांचे संभाषण चालले होते. ते चालू असतां तिच्या मनातील उदासीनतेला लगडलेला सुखाचा वर्ख, खोलीत नाचणाऱ्या प्रकाशमय छाया नि एका नवयुवतीच्या वृत्तीतील लाजरी बुजरी हुरहूर यातील मर्म तो वाग्काईन आपल्या नजरेत टिपीत असता, नाचमधून झणझणणाऱ्या वाऱ्याचा आवाज अधिक खोल झाल्यासारखा व अधिक एकाकी भासला. प्राचीन रेड इंडियनांच्या काळात हा वादळवात या डोंगरदऱ्यातून अनेक रूपांनी वावरत असे, असे म्हणतात. ही रूपें कोणत्या शिखरावर व कोणत्या गिरिगव्हरात वसति करून असत, हे एक रहस्यच होते. वादळवाताच्या या सर्व भूतगणांनी जणू आता एकसुरात कुठल्या तरी गीताचे स्वर गायिले असावेत असे त्या पाहुण्याला वाटले.

प्रेतयात्रेतल्याप्रमाणे बाहेरच्या रस्त्यातून विव्हल स्वर निनादले. मनातली सारी खिन्नता पळवून लावण्यासाठी शेकोटीभोवती जमलेल्यांनी आगीत नवीन लाकडें टाकली आणि जेव्हा ज्वाळांत सुकी पाने तडतडू लागलीं

नि ज्वाळा पुन्हा पूर्वीसारख्या भडकू लागल्या तेव्हा त्याना पुन्हा नीरव शातता आणि सुखाची निरामय जाणीव यानी लपेटून घेतले. खोलीभर त्याच्या माथ्यावर तरल प्रकाश पसरला होता आणि तो त्या सर्वाना जणू सारखा गोंजारीत होता. मुलाची डोकी बिछान्याबाहेर डोकावत होती बाप म्हणजे शक्तीची जणू एक उभी चौकटच होती आईच्या मुद्रेवर एक-प्रकारचा मनोनिग्रह आणि नीटनेटकेपणा प्रतीत होत होता तो आत्मनिष्ठ तरुण, ती नवयुवती आणि शेकोटीच्याजवळ मोक्याची जागा पकडून काहीतरी विणीत बसलेली कुटुबातील आजी—तीहि या वातावरणाचा आस्वाद घेत होती. म्हातारीने आपल्या हातातील काम तसेच चालू ठेवून म्हटले, " तुमच्याप्रमाणेच माझ्यासारख्या म्हाताऱ्या माणसाच्या काहीतरी आवडत्या कल्पना असतात. तुम्ही निरनिराळ्या इच्छा धरीत आहात, सकल्प आखीत आहात, इथून तिथे उडत आहात त्यामुळे माझे म्हातारीचेहि मन आज भटकू लागले. खरे म्हणजे माझी म्हातारीची ती काय इच्छा असणार? कारण, मी आता खड्ड्याच्या अगदी कडेला आले आहे. पण बाळानो, माझ्या मनात काय आहे हे जर मी तुम्हाला सागितले नाही तर माझे प्राण सारखे तडफडत रहतील "

"काय, मनात तरी काय आहे आई तुझ्या?" म्हातारीचा मुलगा व सून दोघानीहि एकदमच विचारले.

म्हातारी जणू काही आता खास रहस्य सर्वाच्या कानात सागणार होती. सर्वांनी तिच्याजवळ आपल्या खुर्च्या सरकवल्या.

आपले जेव्हा दफन होईल तेव्हा ज्या कपड्यानिशी आपले शव कबरीत जावे, ते कपडे काही वर्षापूर्वीच तिने शिवून तयार ठेवले होते. या पोषाखात लिननचा सुदर घुघट होता, मस्लिनच्या बनातीची टोपी होती. किबहुना सर्वच पोषाख चागला होता. लग्न झाल्या दिवसा-पासून तिने कधीहि इतके चागले कपडे घातले नव्हते. परतु आज रात्री अकस्मात् एक जुना लोकभ्रम तिला आठवला. शवाची जर नीट व्यवस्था झाली नाही, कुठे बनातीचे कापडच तलम नसले, किवा डोक्यावर टोपीच नीट बसली नाही असे जर झाले तर ते प्रेत शवपेटिकेतून थडगार हात बाहेर काढते व आपला आपणच जामानिमा करते असे तिच्या

लहानपणीं लोक म्हणत. नुसत्या या विचारानेदेखील तिचा धीर खचला. हें सारें मनोगत म्हातारीनें त्या मंडळीना सांगितलें.

"आजी, काहीतरीच काय बोलतेस?"—आजीच्या मनातली गोष्ट ऐकताना मोठ्या मुलीच्या अंगावर भयाचा काटा उभा राहिला. पण आजी थांबली नाही आपल्या खुळेपणाला हसत पण पूर्वीच्याच कळकळीने ती सांगू लागली—

'तर माझें शव जेव्हा शवपेटिकेत ठेवलें जाईल तेव्हा, बाळानो, तुमच्यापैकी कुणी तरी माझ्या तोंडासमोर आरसा धरला पाहिजे. कुणीं सागावें, कदाचित् मेल्यानंतरहि मी आरशात माझें रूप पाहून घेईन नि माझे कपडे नीटनेटके आहेत याची खात्री करून घेईन."

"आबालवृद्ध आम्ही सारेजणच आपल्या कबरा नि स्मारके याच्या चिंतनात दंग असतो." तो पाहुणा हळू आवाजात बोलला. "जहाज बुडत असताना खलाशाना काय वाटत असेल बरं? अज्ञात व अप्रसिद्ध अवस्थेत त्याना महासागराच्या—त्या अपार आणि नामविरहित कबर-स्थानाच्या—तळाशी ठाव मिळतो."

म्हातारीच्या त्या भीषण कल्पनेचा श्रोत्याच्या मनावर क्षणभर असा जबरदस्त पगडा बसला की बाहेर रात्रीच्या गुडुप अंधारात वादळासारखा काही आवाज होत होता व तो हळूहळू वाढत वाढत खोल नि भयानक स्वरूप धारण करीत होता हे त्याच्या लक्षातहि आलें नाही. त्या आवाजाबरोबर ती झोपडी नि आतील सारे थरथर कापू लागले. एखाद्या विराट् शिंगातूनच जणू हा शेवटला आवाज निघाला असून त्यासरशी पृथ्वीचा पायाच हादरत असल्यासारखे वाटलें. क्षणभर सगळ्याचीच वाचा बंद झाली. क्षणभर ते अचेतन झाले. मग एकदम सगळ्याच्या तोंडून एकच किंकाळी घुमली.

"कडा कोसळतो आहे "

या साऱ्या शब्दातून, येणाऱ्या महासंकटाची भीषणता व्यक्त झाली. साधे शब्द या संकटाचें सम्यक् चित्र कसे रेखाटू शकतील? त्यानी सुरक्षित म्हणून मानलेल्या एका जागेकडे सारे आसऱ्यासाठी धावले. पण हा एक दैवदुर्विपाकच म्हटला पाहिजे. कारण अशा रीतीनं सुरक्षिततेची जागा

सोडून प्रत्यक्ष विनाशाच्या मार्गातच त्यांनी स्वतःला लोटले होते. पर्वताचा कडा क्षणार्धात विध्वंसाच्या प्रतापाप्रमाणे वेगात खाली आला. तो घरापाशी येऊन पोहोचण्यापूर्वीच पलिकडच्या नाल्याला दोन शाखा फुटल्या. इथे खिडकीहि थरारली नाही पण विनाशानं सर्वच आसमंत पायाखाली आणलं. रस्ता अडला आणि विध्वंसानं जेथे जेथे पाय पसरले तेथे तेथे सगळ्याचा पार सत्यनाश केला कोसळलेल्या कड्याचे गर्जित पर्वताच्या कडेकपाऱ्यात विरून जाण्यापूर्वीच त्याच्या वेदना थांबल्या होत्या अन् आता सारे शांत झाले होते. त्यांच्या कलेवराचा कधीच मागमूस लागला नाही

दुसऱ्या दिवशी सकाळीं त्या झोपडीच्या धुराड्यातून राखी रंगाचा कापरा धूर चोरटेपणानं पर्वताच्या बाजूनं वर चढत होता. आत, अजूनहि शेकोटीत लाकडाचे ओंडके जळत होते. आणि झोपडीतील माणसे, कड्यानं जे थैमान घातलं ते पाहण्यासाठी जणू नुकतीच बाहेर गेली असावीत नि ती थोड्याच वेळानं परतणार असावीत तशा शेकोटी-समोरच्या खुर्च्या ठेवलेल्या होत्या.

⁂

# ४. पा र ध

## हर्मन मेलव्हिल

हर्मन मेलव्हिल ( १८१९ ते १८९१ ) हे अमेरिकन लेखक केवळ एक चागल्यापैकी कथाकारच नव्हते तर बुद्धिमान तत्त्वज्ञहि होते. त्याच्या हयातीत ते लोकाना अज्ञातच राहिले. १९१९ नतर अमेरिकन साहित्याच्या उपासकानी पुन्हा त्याचा शोध लावला. आज त्याच्या पुस्तकाना जाणकार रसिकाची वाण राहिलेली नाही.

मेलव्हिल याची अग्रगण्य कथा म्हणजे 'मॉबी डिक' किंवा देवमासा त्या कथेतूनच येथे एक उतारा उद्धृत केला असून त्यांत सागरी जीवनाच्या पण वास्तववादी भीपणरम्य नि साहसी पार्श्वभूमीवर मानव व दुष्ट शक्ति याचे सनातन कालापासून चालत आलेले द्वद्व प्रतीकरूपाने कल्पिले आहे.

बाह्यतः ही एक प्रक्षोभक कथा–साहसकथाच ठरावी. पण अधिक खोलात शिरल्यास जाणकाराना त्यांत मानवाचा आपल्या आत्म्याविरुद्ध जो संघर्ष चाललेला असतो त्या संघर्षाचे गाढ प्रतिबिंब उमटलेले दिसेल.

या कादंबरीचे पूर्वसूत्र असे आहे की, कथानायक ताडेल आहब याचा देवमाशाशी दिलेल्या झुंजीत पूर्वी पाय तुटलेला असतो. अर्थात् देवमाशाला मारीन तरच मी नावाचा आहब, अशा सूडाने त्याचे मन कित्येक वर्षे पेटलेले असते. अखेर देवमासा एकदाचा त्याच्या तावडीत सापडतो. पण हाय! या अंतिम लढ्यात ताडेलाचाच सत्यानाश होतो.

मेलव्हिल याच्या इतर ग्रथांत 'टायपी', ओमू', 'रेडबर्न', 'मार्डी' व 'इस्रायल पॉटर' याचा समावेश होतो.



दर्यावरचा आजचा तिसरा दिवस. झुजुमुजू होताच आभाळाच्या कडाकडावर लाल शिडकाव होऊन सारे जग तजेलदार आणि प्रसन्न दिसू लागले. मुख्य डोलीकाठीवरचा रातपाळीचा टेहळ्या खाली उतरला. आता लहानमोठ्या सगळ्या शिडावर दिवसपाळीची माणसे डोळ्यात तेल घालून समुद्राचा टाव घेत बसली.

"काय, कुठ गवसतो काय र?" आहाबची–तांडेलाची–साद आली. पण अजून तरी देवमासा कुठ दिसत नव्हता. तांडेलाने फिरून हाकारा केला. "आर, हा म्हावरा आपल्या मागानच जायचा. पण बेस, गेला तरी! त्योकाना, पाळत राखा इकत केल तरी बी काम फत्त! आर एऽ तू नाखवा, त्येका सुकाणू नीट पकड. वाऱ्याला घट्ट वोढून धर. मचवा सावकाशीन काढ. दिसबी असा इयाक उगवलाय्! देवाला अशा फाटफटी अगदी नव्या जगात नि नव्या शाकारलेल्या झोपडींत घरपरवेश करायचा असता तरी इकता इयाक दिस उजाडला नसता . वारसुद्धा कस भणभणतय्! आर वा' माझा शानदार मचवा तेच्या साह्यान कसा ठेसात चाललाय्. माझ्या मनामदी बी कसल अपूर्वायच वार फिरतय्.. असच जोरात नि दमात ...आर ए तू काय गवसतय् काय?"

"न्हाईऽ बा .. ताडल"

"न्हाई? ..आर उन माथ्यावर येऊन ठेपलीत. थूःऽ पैका आज भीक मागतोय! आर सूर्याकड तरी बघा जरा! न्हाई .न्हाई .. आपलच चुकल्येल दिसत बर का! देवमासा टोलवून मचवा पुढ आलेला दिसतोय. जपा रऽ त्यान आपली पाठ धरलीय्. मी त्याची पारध करायची ते सोडून तोच माझ्यामाग लागलाय्. माझ डोस्क बी कस अस रिकाम? आर एऽ बेवकूफ! सबूत त्याच्या पोटात खुपसायच्या भाल्याच्याच मागान तो येऊ लागलाय्. सुकाणू फिरवा आनि सगळ खाली या. पण टेहळणी असू द्या बर का. वाल धरून ठ्यावा."

'पिकोद' मचवा ज्या दिशेने चालला होता त्या दिशेने वारा पाठीवर घेऊन त्याला पाणी कापीत पुढे येता यत होते पण आता तांडेलाच्या सांगण्याबरहुकूम, पोटाखालचे सफेद पाणी घुसळीत तो जसा पलट घेऊ

लागला तसे वाऱ्यावर कपाळ आपटून व थोबाड फोडून घेतच त्याला मार्ग काटणे भाग होते.

स्टारबक नावाचा खलाशी आपल्याशीच पुटपुटला, "वाऱ्याशी झुंजत फतेमारी देवमाशाच्या आऽ वासल्या तोंडात चाललीय्" गलबताच्या कठड्याला मुख्य वाळ बांधीत असता त्याने देवाची करुणा भाकली, "या संकटातून तूच एक तारणारा. पण माझ्या आतड्याचं तर पाणी व्हाया लागलय्. अन् चामडं बी आतून जनू भिजतया. घेवा चुकलं माकलं तर साभाळून घे."

तितक्यात तांडेलाचे फर्मान आले की सगळ्यांनी वेळ येताच आपल्या दिमतीला येण्यासाठी कंबरा कसून तयार राहावे दरम्यान तांडेल डोलकाठीवर चढून गेला होताहि.

असा पुरा तास लोटला. तापलेल्या पत्र्यासारखी दुपार तळपत होती. आणि हा एक तास म्हणजे जणू कित्येक युगे भासत होतीं. खुद्द कालपुरुष या घटकेला श्वास अवरोधून धरून धडधडत्या हृदयाने कशाची तरी प्रतीक्षा करीत होता. इतक्यात इतक्यात देवमाशाच्या तोंडातून पाण्याचा फवारा वर उडत असल्याचे तांडेलाने पाहिले. अकस्मात् तिन्ही शिडावरून अग्निजिव्हाप्रमाणे तीन किंकाळ्या घुमल्या.

तांडेलानें मॉबी डिक असे देवमाशाला नाव ठेवले होते. "आज तुझी माझी तिसऱ्यांदा गाठ पडतेय्" असं मॉबी डिकला उद्देशून आव्हानपूर्वक म्हणत तांडेलाने या प्रचंड धुडाशी मुकाबला करण्यासाठी हाताखालच्या खलाशांना करायच्या त्या सूचना केल्या. मग तो आपल्याशीच ओरडला—"जोसात मुसंडी मारतोय् आरऽ कुणीतरी इकडं या. मी उतरतो खाली."

तांडेलाचं फर्मान सुटताच मचव्यावरून लहान लहान होडकीं पाण्यात सोडण्यात आली आपल्या होडीच्या नाळीपाशी उभे राहून तांडेलाने हाक मारली.

"स्टारबक!"

"जीऽ"

"माझ्या मनाच गलबत आज निसऱ्यादा या प्रवासावर चाललया स्टारबक."

"व्हय् जी. तुमच्या मनासारख व्हईल."

"स्टारबक, काही मचवे बंदरातून निघतात खरे. पण त्याचा फिरून ठावठिकाणाच लागत नाही."

"व्हय् जी. खर. अगदी खर."

"काही मानस भागेच्या, व्हटीच्या पाण्यात मरतात. काही समिंदराला भरती आली, समा झाली की गटागळ्या ग्वातात स्टारबक, डेरेदार तुफान लाटेगत माझी अवस्था झालीया. आता म्हातारा झालोय् बाबा. म्हन् माझ चागल होवो."

दोघाच्याहि हाताची पकड एकमेकात दृढ झाली. डोळे डोळ्याना भिडले. स्टारबकच्या डोळ्यातून आसवे पडली. मग तो म्हणाला,

"जी ताडेल. तुम्ही दिलाचे मोठे मचे असे जाऊ नग, नगऽ जाऊ नग. एका निधड्या छाताड्याचा मानूस हाय मी. हा दमछाक ऊर फोडून माझ्या डोळ्यातन पाणी फुटतय् .."

ताडेलाने निर्धाराने आपल्या खांद्यावरचा त्याचा हात बाजूला करून म्हटले, "हा .. समद्याच्याबरोबर तू बी उभा ऱ्हा."

क्षणार्धात मचव्याच्या नाळेखाली होडी घुसली.

तेवढ्यात मचव्याच्या खालच्या अगाकडील साटीतल्या कवाडातनं कुणीतरी ओरडले, "मोऱ्या मोऱ्या दिसतायत. ताडल .माघारी या"

पण ताडेलाचे कान जणू बहिरे झाले होते त्याच्या स्वत.चाच तेवढा आवाज उच्च टिपेवर चढला आणि तितक्यात त्याच्या होडीन मुरकाडी मारली.

पाण्यात मोऱ्या होत्या हे खोट नव्हत. नाळीच्या खाली पाण्याच्या अथाग काळोखातून जणू एकदम असख्य मोऱ्यानी वर झेप घेतली. पतिगाच्या फटकाऱ्यागणिक अत्यत दुष्टाव्याने त्या वल्ह्याच्या सपाट टोका वर आघात करू लागल्या. आपल्या कराल दातानी ताडेलाच्या होडीला ओरखाडे काढीत नि चावे घेत त्यानी शेवटपर्यंत तिचा पिच्छा पुरविला

दूर जाणाऱ्या त्या होडीकडे पाहात स्टारबकन म्हटले, "पोलादाच दिल हाय या हावऱ्या मोऱ्याचा निकाल लावाया हवा न्हाई तर . आन् तशात आजचा तिसरा दिस "

मचव्यापासून त्या लहान लहान होड्या दूर गेल्या नसतील तोच शिडावरून खुणा केल्या गेल्या. तिथले खलाशी पाण्याकडे बोट दाखवीत होते. यातील मर्म ताडेलाच्या लक्षात आल्यावाचून राहिले नाही. देवमासा जवळ आला आहे हे तत्क्षणी त्याने ताडले पण तो वर येताच आपण जय्यत सज्ज असावे म्हणून होडीत एका बाजूला कलता उभा राहून ताडेल दबा धरून राहिला. त्याच्या निधडेपणाने लोक चकित झाले. खलाशी त्याच्याविषयीच्या आदराने भरून बसून राहिले. लाटा मागेपुढे नुसत्या तडाखे हाणीत होत्या.

"जौळ मला गाडाया निघालय जनू. पण न्हाई मी असा मरनार . या उन्मादाच्या भागनच मी मरू शकेन. हाः हाः हाः ऽ ऽ ऽ" ताडेल तुफान हसला.

इतक्यात भोवतालचे पाणी प्रचंड वर्तुळाकार भोवऱ्यानी फुगू लागले. मग पाण्याखाली बुडालेला एखादा हिमनग, चारी बाजूनी पाण्याच्या पृष्ठभागाचा भेद करून वर यावा तसे पाण्याला उधाण आले. जणू भूगर्भातून कसले तरी गुणगुणणे चालावे तसा दबलेला गडगडण्याचा आवाज कानावर येऊन आदळला, आणि आणि डोळ्याचे पाते लवते न लवते इतक्यात समुद्रातून एक प्रचंड पण गलथान धूड स्वतःचे अंग घुमळत तिरप्या धारेत पण सरळ रेषेत मुसडी मारून पुढे घुसले. जाडजूड दोरखड त्या धुडामागे लोंबत होते. आणि त्याच्या अगात भाल्याबरच्याची पाती घुसली होती.

घुसळून निघालेल्या पाण्याच्या फवाऱ्यातून जे विरविरीत धुके निर्माण झाले त्या धुक्यातून ते धूड आता वर आले अन् इंद्रधनुष्याच्या सतरगात न्हाऊन निघाल्यासारखे होऊन पुन्हा जे गडप झाले ते पाण्याच्या अगदी तळाशी. पाण्यावर त्याचा दाब पडताच समुद्रसपाटीपासून तीस फुटापर्यंत असख्य कारजी फुटली. वाऱ्यावर पिसून निघालेल्या हजारो जलकणिकाची या कारज्यातून जणू एक बरसात उलगडली आणि पाण्याचा

पृष्ठभाग पुन्हा पूर्वीसारखा झाला. देवमाशाच्या संगमरवरी तोंडाभोवतीं फसफस या पाण्याचा दुधाळी फेस पसरला.

वल्हीं मारणाऱ्याना ताडेलाने फर्मावले—"सावध."

देवमाशावर प्रखर हल्ला चढवण्यासाठी साऱ्या होड्या पाण्यातून सपकन् पुढे घुसल्या. पण मॉबी डिकच्या अंगात, आदल्याच दिवशी जे भाले घुसले होते त्याच्या जखमानी खुनाची नशा चढली होती. स्वर्गातल्या साऱ्या देवदूताचे बळ त्याच्या एकट्याच्या शरीरात एकवटल्या-सारखा तो त्वेषाने तुटून पडला. त्याच्या शुभ्र मस्तकाच्या ठायीं ठायीं भाले उभे होते अन् त्याच्या पारदर्शक त्वचेखाली त्याची टोके एकत्र जुळविल्या-सारखी दिसत होती. होड्याच्या मधून, सूडाने पाण्यावर सपासप शेपटी आपटीत त्या माशाने पुढे मुसडी मारली. त्यामुळे पुन्हा एकदा होड्या विलग झाल्या. साथीदार खलाशाच्या दोन होडक्यातील भालेबरच्या विसकटून खाली पडले. पण ताडेलाच्या होडीला अजून फारसा धक्का पोचला नव्हता.

देवमाशाच्या धक्क्याने करकर आवाज करीत काही होड्याच्या फळ्या खाली आल्या. डग्गू आणि क्वीकॅग या नावाचे दोन खलाशी मोठ्या प्रयासाने या फळ्या जोडण्याचे प्रयत्न करीत असता होड्याच्या खालून देवमाशाने पुन्हा वर येऊन कुशीने त्याना अशा जोराने ढुसणी दिली म्हणता की काही विचारू नका. कुटून तरी एकदम किंकाळी घुमली. देवमाशाने काल रात्री ज्या पार्शी खलाशाचा बळी घेतला होता त्या खलाशाच्या अर्ध्यामुर्ध्या देहाच्या कुरतडलेल्या मासाने देवमाशाची पाठ भरून गेली होती. कालच्या झुंजीचे वळ नि वण तिथे दिसत होते. या मृत खलाशाच्या कुरतडलेल्या देहातून, बुबुळातूने बाहेर आलेल्या दोन डोळ्यानी म्हाताऱ्या ताडेलाकडे अशा काही विचित्र नजरेने पाहिले की ताडेलाच्या हातातील भाला एकदम गळून पडला.

आपल्या क्षीण आवाजात सारी शक्ति ओतून ताडेल कळवळून ओरडला.

"बनलो. .बनलों रे मी पुरा बनलो. आज /फिरून एकवार तुझं

मढ डोळ्यापुढ येतय्. ह्येच काय तू माझ्यासाठी वाढून ठेवलं आहेस?"  मग तो पुन्हा भानावर येऊन आपल्या साथीदाराना उद्देशून ओरडला—"नागाड्यानो, मचव्यावर माघारी चला. ही होडकी आपल्या कामाची नव्हत. बघा जमल तर गलबतावर दुरुस्त करा न् या परत. पण तोपर्यंत या आम्हला एकट मरू द्या. तुम्ही परके नव्हत. तुम्ही तर माझे हातपाय! .आरऽ देवमासा आता होता न? कुठ गडप झाला?"

खर म्हणजे देवमासा होडीच्या अगदी नजीक आला होता जणू पाठीवरच्या मळ्यासहित त्याला जीव घेऊन पळायचे होते. काल रात्री त्यान जी एक झुज दिली ती त्याच्या प्रवासातील केवळ एका टप्प्या-सारखी जणू त्याला वाटत होती होडी त्याच्या उलट दिशेने येत असता त्याने ती ओलांडून जवळ जवळ पुढे झेप घेतली होती. अत्यंत वेगात त्याला लाटा तरून जायचे असावे व तेहि सरळ आपल्या वाटेने जायचे असावे असे त्याला वाटले.

तेवढ्यात स्टारबकने अजीजीने म्हटले, "तांडेल, आजचा तिसरा दिस. पण अजून वकुत गेलेला नाही देवमाशाला तुमची पारध करायची चिन्ता नाही. आन तुमी तर डोक्स फिरल्यागत त्येची पाठच धरलीया."

एकाएकी पाढऱ्याशुभ्र देवमाशाची गति मंदावल्यासारखी वाटली सतत तीन दिवस त्याची ससेहोलपट करण्याचा जो प्रयत्न झाला त्यामुळे तो थकला होता, की त्याच्या स्वभावातला छद्मीपणा नि दुष्टावा उतास आला होता म्हणून त्याने आपली गति कमी केली होती, हे सागणे कठीण आहे. तांडेलाची होडी पुन्हा त्याच्या अगदी नजीक येऊन ठेपली. ही होडी लाटावर हिंदकळत असता मोऱ्यानी तिचा पिच्छा पुरविण्याचे चालूच ठेवले होते. वल्ह्याला चावे घेऊन त्यानी ती इतकी कुरतडून टाकली की त्याचा भुगा व्हायची वेळ आली होती. लाटावर या वल्ह्याचे तुकडे इतस्ततः तरगत होते.

तांडेलाची होडी आपल्या अगदी अगाला घसटून चालण्याइतकी

जवळ आली आहे याची देवमाशाला जणू सुदबुदहि नव्हती. असें होतें कधी कधी .

देवमाशाच्या तोंडातून उडणाऱ्या पाण्याच्या फवाऱ्यामुळे जे पर्वतप्राय धुके निर्माण झाले ते तांडेलाच्या पाठुंगळीला चिकटले, त्याच्या पाठीचें कुबड या धुक्याने पुरते वेढून गेले तितक्यात चपळाईने देहाची कमान करून, हात उचावून त्याने नेम धरला व देवमाशाला संतापाने एक अस्सल शिवी हासडून त्याने झपाट्याने आपला प्रखर भाला त्याच्या पाठीत खुपसला. एखाद्या चिखलात रुतावे तसे हे धारदार पोलाद अन् तांडेलाची शिवी देवमाशाच्या वर्मी घुसली असावी त्या वेदनेत देवमासा असा वळवळला की आपसूक उताणा होऊन त्याने आपल्याच अंगाला एक हिसडा दिला व होडीला भगदाड पाडण्याच्या भानगडीत न पडता तिला नुसती ढुसणी देऊन त्याने ती उलटून टाकली बरं तर बरं, तांडेल होडीच्या वरच्या अंगाला चिकटून राहिला, नाही तर सरळ समुद्रात फेकला गेला असता तिथे वल्हीमार मात्र पाण्यात फेकले गेले. तांडेलाने इतक्या झपाट्याने भाला मारला होता की त्यांना सावध राहण्याला त्याने अवसरच मिळू दिला नाही सुदैवाने यापैकी दोघे होडीवर पुन्हा चढू शकले. पण तिसरा मात्र असहायपणे पाण्यात गटांगळ्याच खात राहिला.

तितक्यात वेळ साधून कमालीच्या चपळाईने व जणू प्रबल इच्छा-शक्तीने देवमाशाने लाटांच्या तडाख्यातून पुढे झेप घेतली. तांडेलाने सुकाणूवाल्याला सावधगिरीचा इशारा दिला. वाव नीट धरायला सांगितले. इतक्यात वरच्या हवेतच तो दोरखंड तुटला.

"कुठं काय फुटलं काय रं? बचा—बचा! सांभाळा रं पोरिंगे. देवमासा नजीक आलाय् त्याच्यावर सगळ्यांनी तुटून पडा."

देवमाशाने एकदम पलटी खाऊन झुंजायच्या इराद्याने कपाळ पुढे केले अन् तो दबा धरून तरंगू लागला. पण होडीची काळी नाळ आपल्या जवळ जवळ सरकत असल्याचे त्याच्या लक्षात आले. आपली ससेहोलपट करणारा हाच दुष्ट दुष्मन आहे असे त्याच्या मनाने पक्के घेतले की काय कोण जाणे. त्याने एकदम जबडा उघडला. आणि प्रखर अग्निवर्षाला-सारखा फेस उधळीत प्रक्षुब्धपणे तो चाल करून गेला.

तांडेल अंतर्बाह्य हादरून निघाला. त्याने कपाळावर हात मारून घेत म्हटले, "आर   माझं डोळं चाललं काय? नजर ठरत न्हाई. मी आंधळा होतोया. आरऽ कुणी हात द्या. मला सावरा. मला रस्ता गावत न्हाईसा झालाया   रात पडलीया काय?"

होड्याला चिकटून बसलेल्या वल्हेमाऱ्यानी आरोळी ठोकली, "देवमासा   देवमासा   अन् होडी बी जातीया   "

"वल्ही   वल्ही ..समिंदरा, पाताळाचा ठाव घ्याया निघालायस जनू? आरऽ माझं घास घ्याया टकती घाई र का?   . माझ्या नावाड्यानो, वाइच्च सबूर. करा हल्ला. माझ्या होडीचं बचाव करनार आता तुम्हीच."

समुद्राच्या लाटा क्षणोक्षणी होडीच्या अंगात पाचर मारीत होत्या, आणि देवमाशाच्या तडाख्याने तर होडीच्या अंगाला चांगलाच हादरा बसला होता. त्यामुळ होडीच्या फळ्याच्या या क्षणीं पार चिरफळ्या उडाल्या. किंचित्काळ होडीचा वरचा भाग लाटाच्या पृष्ठभागाशी एकजीव झाला. खलाशी होडीत भरत जाणारे पाणी बाहेर काढून टाकण्यासाठी घमत मारण्याची शर्थ करीत होते.

या घनश्चक्रीतून तांडेलाचे पुढील शब्द कानावर पडले.

"देवमासा   देवमासा   सुकाणू वर खेचा   आरऽ पंचमहाभुतानो, मला आपल्या कुशीत कवळून घ्या. जपून   वऱ्यावरचा हात सोडू नका. आला. देवमासा आला पुन्हा   त्याच्या डोळ्यात इंगळ पेटल्यागत दिसत्यात. पण मी डरणारा न्हव. हतच्च मी चिकटून न्हाईन. येवा, मला हात द्ये."

मचव्यावरचे सारे नावाडी यावेळी स्तिमिततेने आ वासून पाहातच्च राहिले होते. हातोडे, लाकडी तक्ते, भाले-बरच्या सारी हत्यारें यंत्रवत् त्याच्या हातात नुसती पडून होतीं. देवमासा तुटून पडत असता त्याच्या अंगात बदला, खुनशी सूड आणि चिरकालीन दुष्टावा याचा मूर्तिमंत सञ्चार झाल्यासारखे वाटलं. होडीवरच्या मर्त्य मानवानी पराकाष्ठा करूनहि त्याच्या त्या पाढऱ्या कपाळाच्या नुसत्या धडकेनेसुद्धा होडीतील माणसं नि त्यातले सारे काहीं अंतर्बाह्य हादरून गेले. होडीतील खलाशाच्या माना

म्हणजे धष्टपुष्ट बैलाच्या वशिंडासारख्या होत्या. पण चाक काढून घेतलेल्या ट्रकासारख्या त्याहि कोलमडल्यासारख्या झाल्या. होडीला भगदाड पडलें नि आता पर्वताच्या कड्यावरून उडी घेणाऱ्या धबधब्यासारखे समुद्राचें पाणी होडीत धो धो शिरू लागलें.

देवमाशानें पुन्हा धडक देताच ताडेलानें फिरून भाला खुपसला. देवमासा पुढें घुसला. स्फोटक वेगाने वाल टाकला गेला. त्याला वाट करून देण्यासाठी ताडेल थोडा वाकलाहि. पण नेमके त्याच वेळीं दोरखडाचे उडते टोक त्याच्या मानेभोवतीं फासासारखे रुतून बसून त्याच्या व नावाड्याच्या ध्यानीमनीहि नसता तो समुद्रात फेकला गेला. दुसऱ्याच क्षणीं वालाचा होडीत पडलेला जाडजूड वजनदार शेडा खेचला जाऊन त्याचा दुसऱ्या एका खलाशाला प्रखर तडाखा बसला. मग त्या दोरखडाने तितक्यच उग्रपणे समुद्राच्या पाण्यावर आघात केला नि ते पाण्यात कुठल्याकुठे लुप्त झाले.

क्षणभर होडीवरचे इतर खलाशी कसलीतरी भुरळ पडल्यासारखे चिडीचिप झाले. मग कुणीतरी ओरडले "आरऽ मचवा .मचवा कुठ हाय देवा! देवा .!"

थोड्या वेळाने दूर दूर मचव्याचे अधुक भूत त्याच्या दृष्टिपथात आले. अगदी वरचीं शिडे तेवढी पाण्यावर दिसत होतीं. अन् अजूनहि आपले भाले घेऊन पाखडी खलाशी, कसल्याशा आसक्तीने म्हणा, एकनिष्ठेमुळें म्हणा, की दैव त्याना कुठेतरी ओढून नेत होते म्हणून म्हणा, आपल्या बुडत्या नजरानी समुद्राची टेहळणी करीत बसलेले तेथे दिसत होते. इकडे होडीची अवस्था तर पाहायलाच नको. होडीतले नावाडे, वल्ही, तात्पर्य सारे जीव चक्राकार गर्तींत दूर दूर फेकले गेले. अन् पिकोद मचव्याच्या अवशेषाचे दर्शनहि दुर्मिळ झाले. वर आकाशात अधाशी बगळे फिरू लागले. आणि पाच हजार वर्षांपूर्वी या समुद्राच्या लाटानीं जसा घोळ घातला होता तसाच आताहि त्या घालू लागल्या. पुन्हा एकदा समुद्राने आपलें कफन पसरलें.

◊ ◊ ◊

# ५. शै ल मु द्रा

## नॅथॅनिअल हॉथॉर्न

नॅथॅनिअल हॉथॉर्न हे १९ व्या शतकातले अमेरिकेचे सर्वांत प्रसिद्ध कादबरीकार व लघुकथालेखक. अमेरिकन तत्त्वचिंतक रॉल्फ वॅल्डो इमर्सन व हेन्री डेव्हिड थोरो हे त्याचे समकालीन व शेजारी होते.

ज्या प्रचंड शैलमुद्रेविषयी हॉथॉर्न यांनी ही कहाणी रचली आहे ती शैलमुद्रा अमेरिकेच्या न्यू हॅम्पशायर राज्यातील प्रोफिलो पर्वतात खरोखरीच अस्तित्वात आहे. वाऱ्याने व वरुणाने पर्वताच्या कड्यावर हें शिल्प खोदले असावे. दरवर्षी हजारो प्रवासी या शैलमुद्रेचे दर्शन घेण्यास येत असतात. निसर्गाच्या या भव्य चमत्कृतीने ते स्तंभित न झाले तरच नवल!



संध्याकाळीं सूर्य मावळत असता ती माता आपल्या मुलाला मांडीवर घेऊन आपल्या झोपडीच्या दाराशी बसली होती. प्रचंड शैलमुद्रेविषयीं ती त्याला सांगत होती. दृष्टि वर करून समोर पाहिले की कित्येक मैल अंतरावरूनहि ही शैलमुद्रा नजरेत भरे. सूर्यप्रकाशात या शैलमुद्रेचा अवयव न् अवयव लखलखत्या तेजाने तळपताना दिसे.

निसर्गाने आपल्या भव्य क्रीडावृत्तीतून ही प्रचंड शैलमुद्रा तयार केली होती. पर्वताच्या एका सपाट बाजूवर जे मोटमोठे शिलाखंड इतस्ततः विखुरले होते ते जणू अशा योजनेने कीं योग्य अंतरावरून पाहिल्यास तेथे कुणीतरी राक्षसी मानवी मुद्राशिल्प खोदल्यासारखे वाटावें. भालप्रदेशाची विशाल कमान चांगली शंभर फूट उंच होती, नाक ठसठशीत होते, व ओठाच्या पाकळ्या विस्तीर्ण होत्या. या ओठांना जर वाचा येती तर दऱ्याखोऱ्यातून त्यांचे शब्दगर्जित गडगडत आसमंतात घुमलें असतें. मेघांना उजळून टाकणारा व सूर्यप्रकाशालाहि मोहरून टाकणारा कनवाळूपणाचा भाव या मुद्रेवर दिसे. प्रचंड शैलमुद्रेच्या दृष्टीतून पाझरणारी ही कृपाच त्या खोऱ्यातील जमिनीला पालवीत, फुलवीत, पिकवीत होती अशी तेथल्या जनतेची भोळीभाबडी श्रद्धा होती.

"आई, त्याला बोलता येईल का ग? किती चांगले होईल! अन् किती प्रेमळ दिसतो ग हा माणूस! त्याचा आवाज अगदी गोड असेल, नाहीं?" तो अजस्र तोंडवळा जणू स्मितवदनानें आपल्याकडे पाहात आहे अशा भावनेने त्याने आईला म्हटले. अर्नेस्ट असे या मुलाचें नाव होते.

आई म्हणाली, "कुणीतरी भाकित वर्तविले आहे, बाळ. तें जर खरें झालें, तर आपणाला आज ना उद्या हुबेहूब अशा चेहऱ्याचा मनुष्य या पृथ्वीवर अवतरलेला दिसेल."

"कसले भाकित आई? सांग ना मला—" त्याच्या शब्दांत उतावळी होती.

आईनें त्याला तिनें स्वतःच्या लहानपणीं आईच्या तोंडून ऐकलेली गोष्ट सांगितली. आज अर्नेस्ट होता त्यापेक्षाहि ती त्या वेळीं लहान होती. हें भाकित असे होते कीं, या खोऱ्याच्या परिसरातच एक मूल

जन्माला येईल व कालातगंन आपल्या काळातील अत्यत थोर व उदार-चरित पुरुप म्हणून त्याची गणना होऊ लागेल. हा महामानव मोठेपणीं हुबेहूब या प्रचड शैलमुद्रेसारखा दिसेल.

आईनें सागितलेली ही गोष्ट अर्नेम्ट कधीहि विसरला नाहीं. त्याच्या मनींमानसी ती त्रिबून राहिली होती. ज्या झोपडीत त्याचा जन्म झाला तेथेच त्याचें बालपण गेले. कर्तव्यदक्ष व मातृवत्सल असा तो मुलगा होता. आपल्या लहानशा हातानी व त्यापेक्षाहि अधिक आपल्या प्रेमळ हृदयानें आईला हरकामात तो मदत करी दिवसाचे कामधाम सपलें की तास न् तास त्या शैलमुद्रेकडे तो टक लावून बसे. त्याच्या साधेपणान दुसऱ्याला चटकन् विश्वासात घेण्याची वृत्ति होती. या साधेपणाला कोमल भावनाहि लगटलेल्या होत्या. या साधेपणामुळे इतराना जे दिसत नव्हते तें त्याला प्रतीत होऊ लागलें आणि त्याचमुळे त्या मुद्रेतील ममतेची पाखर वस्तुतः सर्वासाठी असूनहि ती आपल्या एकट्यावरच्च घातली आहे असे त्याला वाटू लागले.

याच सुमाराला अशी अफवा पसरली कीं कित्येक युगापूर्वीचे भाकित खरें होऊ घातले असून त्या प्रचड शैलमुद्रेशी साधर्म्य असणारा महा मानव अखेरीस खरोखरीच अवतरला आहे. या महामानवाचे नाव होते गॅदर गोल्ड. आता, हा गॅदर गोल्ड जसा चाणाक्ष होता तसाच कामसूहि पण. शिवाय नियतीनें या माणसाला बलवत्तर नशीब दिले होते. त्याच्या जोरावर तो एक अत्यत धनाढ्य व्यापारी झाला. कालातरानें अशी वेळ आली कीं आपल्या सपत्तीची नुसती गणती करण्यालाच त्याला शभर वर्षे लागलीं असतीं. या वेळीं आपल्या जन्मस्थळीं जाऊन उर्वरित काळ तेथेंच व्यतीत करण्याची त्याला इच्छा झाली. हा सकल्प योजून, आपल्यासारख्या लक्ष्मीपतीला शोभेसा भव्य प्रासाद बाधण्यासाठीं त्यानें एक कसबी वास्तुशिल्पकारहि पाठवून दिला. कालातराने हा भव्य वाडा बाधून झाला. युगानुयुगाच्या विलबानतर पूर्वी वर्तविलेल्या भाकिताप्रमाणे अखेरीस असा महान् उदारचरित पुरुप आपल्या खोऱ्यात प्रकटणार आहे या कल्पनेने एकडे अर्नेस्टच्या मनात मोठी खळबळ माजली होती.

एके दिवशीं रस्त्याचें वळण ओलांडून चार घोड्याची एक गाडी पुढे आली. गाडीच्या खिडकीतून एका वृद्ध माणसाच्या शरीराचा भाग पुढे आलेला दिसला. ज्याला हात लागेल त्याचें सोने व्हावें असा वर मागणाऱ्या मिडास राजाच्या हाताप्रमाणे त्याचे हात होते. त्या आपल्या हातानीच जणू त्याने स्वतःची मूर्ति घडविली असावी तशी त्याची त्वचा पिवळी होती. त्याच्या कपाळाची पट्टी अरुंद होती, डोळे लहानसेच पण भेदक होते, आणि त्याच्याभोवतीं असख्य सुरकुत्या पडल्या होत्या. त्याचें ओठ पातळ होते. अन् जेव्हा तो दाबून धरी तेव्हा तर ते अधिकच पातळ दिसत.

त्याला पाहताच इकडून तिकडून एकच गिल्ला झाला, "हुबेहूब प्रचड शैलमुद्रेची प्रतिमा. नक्की, हे जुने भाकितच खरे ठरले आहे."

अर्नेस्टच्या मनात मोठा गोंधळ उडाला. अशा जाणिवेनें कीं या लोकाचा खरोखरीच असा भाव होता की शैलमुद्रेसारखा दिसणारा महापुरुष तो हाच. या विद्रूप चेहऱ्यावरील वळवळ्यातून प्रत्ययाला येणाऱ्या धूर्तपणापासून घोर निराशेने त्याने दुसरीकडे तोंड वळविलें व तो खोऱ्याच्या वर दूर पाहू लागला. तेथे धुके जमत होते. पण या धुक्याच्या अवगुठनातूनहि त्याला ते दिव्य अवयव भासमान होत होते. मावळत्या सूर्यकिरणाची सोनेरी झाक तेथें पसरली होती. त्या ममताळू ओठाना काहीं तरी सागत असावेंसे वाटत असावे. "तो येणार आहे. भिऊ नकोस. अर्नेस्ट, हा महामानव एके दिवशीं नक्की अवतरेल—" असेच जणू ते ओठ म्हणत होते.

अशीं वर्षामागून वर्षे गेली. अर्नेस्टने कौमार्यातून यौवनात पाऊल टाकलें. दिवसाचे काम सपल्यावर तो कुठे तरी एकात पाही व तेथें जाऊन त्या प्रचड शैलमुद्रेच्या चितनात निमग्न होई. या त्याच्या छदा पलिकडे लोकाना त्याच्या व्यक्तित्वात काहीं आगळे वैशिष्ट्य कधीच दिसले नाही. ही प्रचड शैलमुद्रा त्याची गुरु झाली आहे, तिच्या मुद्रेतून प्रकट होणारा भाव त्याच्या अतःकरणाला विशालतेची दीक्षा देणार असून इतराहून व्यापक व गाढ अशा सहानुभूतीचे नितळ झरे तेथें निर्माण करणार आहे, याची त्या लोकाना कुठून कल्पना?

11 4200

या वेळेपर्यंत गॅदर गोल्ड मरण पावून त्याचें दफनहि झालें होतें. त्याच्या सोन्याचा धूर विरून गेल्यानंतर, या दिवाळखोर व्यापाऱ्याच्या विद्रूप चेहऱ्यांत व पर्वतातील त्या भव्य पाषाणमुद्रेत कसलेंहि वैशिष्ट्यपूर्ण साम्य नसल्याबद्दल जवळजवळ सर्वांत एकवाक्यता झाली होती.

यानंतरची गोष्ट. याच खोऱ्याचा एक पुत्र बऱ्याच वर्षांपूर्वी सैन्यात दाखल झाला होता. पण बऱ्याच झुंझार लढाया देऊन तो सेनापतिपदापर्यंत चढला व नावारूपास आला. वार्धक्यामुळे तो आता पागळा झाला होता. जखमांचे व्रणहि त्याच्या अंगावर होते. लष्करी जीवनाच्या धामधुमीला त्याचें मन विटलें होते. रणदुदुंभीला त्याचे कान किटले होते. आता त्याला जन्मस्थानी यायचे होतें. पुनः एकदा लोक सांगोवांगी ग्वाही देऊ लागले कीं प्रचंड शैलमुद्रेशी साधर्म्य असलेला महामानव या खेपेला मात्र खरोखरीच या खोऱ्यात उतरणार आहे. त्याच्या स्वागताच्या दिवशी खोऱ्यातल्या इतर लोकांबरोबर अर्नेस्टहि आपले काम सोडून या वीराला सामोरा व्हायला निघाला.

हें खरें कीं, सत्कृत्यें पेरीत, लोकांना सुखी करीत, वाणींतून सुविचार फुलवीत येणाऱ्या शांतिदूतासारखा हा महापुरुष असेल अशी अर्नेस्टनें भाकितात सांगितलेल्या महापुरुषाविषयीं कल्पना बांधली होती. पण आपल्या स्वभावाला अनुसरून व्यापक दृष्टिकोनातून पाहिल्यावर त्याला असें दिसून आलें कीं मानवतेला आशीर्वाद देण्यासाठी निसर्ग दुसराहि एखादा मार्ग पसंत करील.

"सेनापति सेनापति आले.. गप्प! .गप्प राहा. रणझुंझार आता भाषण करतील." सगळीकडून एकच गलका झाला. अर्नेस्टनें त्याला पाहिलें, दोन सन्मानचिन्हे त्याच्या छातीवर झगमगत होतीं. त्याच्या गळ्याची कॉलर हनुवटीखाली वर दुमडलेली होती. तीवर जरतारी भरतकाम केलेलें होते. या माणसाच्या चेहऱ्यात व त्या प्रचंड शैलमुद्रेत लोक ग्वाही देतात तितके खरोखरच साम्य आहे काय? युद्धानें थकलेला, वाऱ्यावादळानें झोडपलेला हा चेहरा होता. त्यात उत्साहशक्ति व पोलादी इच्छाशक्ति होती हें जरी खरे तरी शैलमुद्रेतील सौजन्यशील प्रज्ञा आणि गाढ, व्यापक नि कोमल सहानुभूति या गोष्टींचा तेथे अभावच होता.

पर्वताच्या एका बाजूवर कुणी राक्षसी शक्तीनें आपल्या हातानीं अजस्र मानवी मुद्रा-शिल्प खोदलें असावें तसे वाटायचे.

"छे! हा काही भविष्यवाणीनें सांगितलेला मनुष्य नव्हे," अर्नेस्टने स्वतःशीच विषादाने सुस्कारा टाकला. पण त्याच्या हृदयाने त्याला धीर दिला—"भिऊ नकोस, अर्नेस्ट."

अशींच आणखी काहीं वर्षे झपाट्याने पण बिनबोभाट शांततेने निघून गेली. अर्नेस्ट अजूनहि तेथेच होता. पण आता त्याचे मध्यम वय झाले होते. मानवतेच्या भल्यासाठी आपल्या जीविताचा अत्युत्तम काळ त्याने पारमार्थिक आशाआकांक्षा उभाविण्यात घालविला होता. या काळात जणू काहीं देवदूतांशीच तो बोलत होता. अन् जणू अजाणता त्याच्या प्रज्ञेचा अंश त्याने आपल्याहि आचरणात बिंबविला होता. जवळ जवळ अनिच्छयाच तो उपदेशकहि बनला. त्याच्या हातावाटे बिनबोभाटपणे घडत जाणाऱ्या सत्कृत्यातून जे विचार पालवले त्या विचाराचा शुद्ध व उच्च बाळबोधपणा आता त्याच्या वाणींतूनहि स्रवू लागला होता. त्याच्या मुखातून व्यक्त होणाऱ्या सत्यानी श्रोत्याच्या जीवनावर नवा ठसा उमटविला—या जीवनाची नवी जडणघडण केली.

लोकाचीं डोकीं थोडी थंड होताच, त्या रणधुरंधर सेनानीच्या चेहऱ्याचें आपण त्या प्रचंड कृपामय शैलमुद्रेशी जें साधर्म्य कल्पीत होतों तें चूक आहे, हें ते हळूहळू मान्य करू लागले. हे होते न होते तोंच नवे वृत्तान्त येऊन थडकू लागले कीं या खेपेला एका प्रसिद्ध मुत्सद्द्याच्या स्कंधावर प्रचंड शैलमुद्रेचे साम्य खडें झाले आहे. पूर्वीच्या लक्ष्मी-पतीच्या संपत्तीऐवजी व योद्धयाच्या तलवारीऐवजी या माणसाकडे फक्त वाणी होती म्हणे! पण दोन्हीपेक्षा या वाणीचे सामर्थ्य अधिक होतें. या वाणीच्या जोरावर त्यानें आपल्या देशबांधवाना, राष्ट्रपतिपदाच्या जागेसाठीं आपणाला उभे करावयास लाविलें. तो राष्ट्र-पति म्हणून निवडून यावा यासाठीं त्याचे मित्र आपल्या प्रयत्नाची पराकाष्ठा करीत होते. हे प्रयत्न चालले असता तो आपले जन्मस्थान असलेल्या या खोऱ्याच्या सरहद्दीकडे वळला. राज्याच्या सरहद्दीवर त्याचे स्वागत करण्यासाठी खोऱ्यातून घोडेस्वाराची एक पलटणच्या पलटण

त्याला सामोरी गेली. चार पाढऱ्या शुभ्र घोड्यांनी जोडलेली एक गाडी समोरून येत होती व तींत दुसरे कुणी नव्हते, तर स्वतः हे माननीय मुत्सद्दी बसले होते. त्याच्या भव्य कपाळावर शिरस्त्राण नव्हते.

अर्नेस्टचा एक शेजारी त्याला म्हणाला, "प्रचंड शैलमुद्रेशी स्पर्धा करीत असा महापुरुष येथे आला आहे असे आता तरी कबूल करशील काय?" हे मान्य केले पाहिजे असे अर्नेस्टलाहि प्रथम वाटले. एखाद्या प्रचंड भीमकाय आकृतीबरहुकूम मोठ्या धाडसीपणानें व समर्थ हातानी त्याचा चेहरा खोदला असावा असे वाटायचे खरे. पण त्या शैलमुद्रेला उजळून टाकणारी जी एक उदात्तता व भव्यता होती, दैवी करुणेचा जो विश्वाकार भाव तेथे विसावला होता, आणि ज्यामुळें शिलारूपातील त्या चिंतनशीलतेला ईश्वरी चैतन्याचें आकाशधूसर, विरळ स्वरूप झाले होते, त्याचा मागमूसहि नव्हता.

"नाहीं—मला तर या दोघात कसलेहि साम्य दिसत नाहीं," अर्नेस्ट म्हणाला. व्यथित आणि निराश अंतःकरणाने तो मागे फिरला. त्याच्या आतापर्यंतच्या निराशातील आजच्या निराशेचें स्वरूप सर्वांत दारुण होते.

आणखी वर्षे गेली. आपल्या या पळापळीत कितीदा या वर्षांनीं एक-मेकाच्या पायावर पाय दिले असतील! अर्नेस्टच्या डोक्यावरील केस पाढरे झाले. कपाळावर वार्धक्याच्या सुरकुत्या उमटल्या. गालावरून नागराचे चर उमटले. पण या सुरकुत्यातून व चरातून कालपुरुषाने सुविचाराच्या अनेक आख्यायिका लिहून काढल्या होत्या आणि अनेकाचे आराध्यदैवत ठरलेली कीर्ति न मागता न सवरता आता त्याच्या दाराशीं आली होती. दूरदूरच्या महाविद्यालयातून मोठमोठे प्राध्यापक व शहरातून अन्य नागरिक आता त्याच्या भेटीसाठी व चर्चा करण्यासाठी येऊ लागले.

दरम्यान नियतीने धरणीला एका नव्या प्रतिभाशाली कवीचे वरदान दिले. हा कवीहि या खोऱ्यातच जन्मला होता. पण त्याच्या आयुष्याचा बराचसा काळ दूर शहरातच गेला. पण म्हणून त्याला प्रचंड शैलमुद्रेचे विस्मरण घडलें नव्हते. उलट तिचे स्तवन करणारे स्तोत्र त्याने रचले होते. अर्नेस्टपर्यंत या कविता पोचल्या. पण कवीच्याहि कानी अर्नेस्टची कीर्ति पोंचली होती. त्यामुळे एके दिवशी ग्रीष्म ऋतूच्या एका सकाळी रेल्वेनें तो अर्नेस्टला

भेटण्यासाठी निघाला. गाडींतून उतरून तो अर्नेस्टच्या दाराशी आला तेव्हा हा वृद्ध पुरुष हातात कसलेसे पुस्तक धरून आळीपाळीने ते पुस्तक वाचीत होता आणि थोड्या वेळाने पुस्तकात खुणेचे बोट ठेवून देऊन त्या प्रचंड शैलमुद्रेकडे निरतिशय प्रेमाने टक लावून पाहात होता.

अत्यंत चतुर व प्रज्ञावान् पुरुषाशी संभाषण करण्याचा कवीचा काहीं आजचाच पहिला प्रसंग नव्हता. पण अर्नेस्टसारखा मानव त्याला अजून भेटला नव्हता. याउलट कवीच्या काव्यातून सौंदर्याच्या ज्या एक एक सजीव प्रतिमा निर्माण झाल्या होत्या त्यांनी अर्नेस्टच्या भावनांनाहि ढवळून काढले होते

उत्कटतेनें त्यानें कवीच्या मुद्रेचे निरीक्षण केले. मग त्या प्रचंड शैल मुद्रेकडे त्यानें कटाक्ष टाकला. फिरून मनाच्या अनिश्चिततेत आपल्या पाहुण्याकडे त्याने पाहिले पण त्याच्या चर्येवर विषादाची स्पष्ट छटा उमटली.

"का? खिन्न झालात एकदम?" कवीनें विचारलें.

"एक भाकित खरे होईल म्हणून जीवनभर मी वाट पाहिली. अन या कविता वाचताना असे वाटले की तुमच्या रूपानें तरी हें भाकित खरें होईल. पण . "

"म्हणजे या प्रचंड शैलमुद्रेशीं माझी चर्या जुळेल असे आपणाला वाटत होते?" कवीनें मंद स्मित करीत विचारले. "पण या कृपाघन, भव्य प्रतिमेशीं माझी तुलना व्हावी अशी माझी पात्रता नाहीं."

"का बरे?" अर्नेस्टनें विचारले. "हे काव्यविचार काय दैवी नाहींत?"

कवि म्हणाला, "त्यात दैवी अंश आहे इतकेच. मला भव्य स्वप्ने पडलीं असली तरी स्वप्ने ती स्वप्नेच. कधी कधीं तर निसर्गातील नि मानवी जीवनातील माझ्या शब्दांनीच व्यक्त केलेली भव्यता, सौंदर्य व सद्भाव यावर माझी स्वतःचीच मुळीं श्रद्धा जडत नाही."

कवीच्या वाणीत आर्द्रता होती. डोळ्यात आसवे गोळा झालीं होती. अर्नेस्टच्या हृदयातहि असाच गहिवर दाटून आला होता.

सूर्यास्ताची वेळ आली तसा अर्नेस्ट आपल्या सामुदायिक साय-प्रार्थनेला व चर्चेला हजर राहण्यासाठी बाहेर पडला. खुल्या सभेत अर्नेस्ट हृदयाच्या गाभ्यापासून निघालेले मनोगत लोकाना सागू लागला. ते ऐकताना कवीला असे वाटलें की, आपल्या कुठल्याहि महान् काव्यापेक्षा अधिक उदात्त असे काव्य अर्नेस्टच्या चरित्रात भरून राहिले आहे.

दूर मावळत्या सूर्याच्या सोनेरी प्रकाशात, धुक्याच्या दाट आवरणा-तूनहि ती प्रचड शैलमुद्रा दृग्गोचर होत होती. अर्नेस्टच्या भृकुटी भोवतालच्या पाढऱ्या केसाप्रमाणे हे धुके दिसत होते. सबंध जगावर या मुद्रेची कृपादृष्टीची पाखर पडली असावी असे वाटत होते.

इतक्यात आपल्या विचारौघात अर्नेस्टच्या चर्येवर असा एक भव्य भाव प्रकटला की, त्यातील परम कनवाळूपणाच्या साक्षात्काराने कवीनें एकदम हात उचावून म्हटलें :

"अरे पाहा पाहा या प्रचड शैलमुद्रेशी अर्नेस्टच्याच मुद्रेचे साधर्म्य आहे."

सगळ्याच्या माना तिकडे वळल्या. कवीनें उच्चारलेले सत्य त्याना मनोमन पटले. युगानुयुगाचे भाकित खरे झालें. पण अर्नेस्टच्या ते गावींहि नव्हतें. आपलें सागणें सपताच कवीच्या हातात हात घालून तो मद पावले टाकीत आपल्या घराकडे वळला. अजूनहि त्याच्या मनाशी त्यानें एकच आशा बाळगली होती की केव्हा तरी या शैलमुद्रेशी साधर्म्य असलेला आपल्याहून अधिक प्रज्ञावत व अधिक चागला असा पुरुष या धरणीवर जन्म घेईल.

♠ ♠ ♠

# ६. तिचा निर्णय

**फ्रँक आर. स्टॉकटन**

फ्रँक रिचर्ड स्टॉकटन (१८४३–१९०२) हे एक प्रख्यात अमेरिकन विनोदी लेखक होऊन गेले. ते कथालेखक व कादंबरीकार म्हणून ख्यातनाम झाले होते. शाळेत असल्यापासून त्यांनी कथालेखनास प्रारंभ केला होता आणि त्या वेळेपासून त्यांच्याबद्दल बऱ्याच अपेक्षा निर्माण झाल्या होत्या. त्यांनी अनेक नियतकालिकांतून कथा लिहिल्या आणि पुढे ते 'सेंट निकोलस मॅगॅझिन' या नियतकालिकाचे संपादक बनले. त्या काळांत त्यांनी मुलांसाठी बरींच पुस्तके लिहिलीं. तेथून निवृत्त झाल्यानंतर स्टॉकटन हे नटले, न्यू जर्सी येथे आपल्या घरी गेले व तेथील शांत, निसर्गरम्य वातावरणांत त्यांनी कांहीं उत्कृष्ट ग्रंथ लिहिले.

त्याच्या ग्रथावर त्याच्या वैशिष्टयपूर्ण व्यक्तिमत्त्वाची जबरदस्त छाप आहे. रॉबर्ट अंडरवुड जॉन्सन त्याच्याबद्दल म्हणतात, "ते असे लेखक होते की, वाचकाना त्याच्या ग्रथाच्या वाचनाने निरागस आनद होतो आणि त्याच्या विनोदाने वाचक हर्षभरित होतो."



फार प्राचीन काळच्या एका राजाची ही कथा आहे. हा राजा अर्धवट रानटी होता. त्याच्या शेजारच्या राष्ट्रातील लॅटिन लोक काहींसे सुधारलेले होते. त्याच्यामुळे या राजाचा रानटीपणा थोडा घटला होता, त्याच्यामध्यें थोडा सुधारकी सफाईदारपणा आला होता हे खरे. पण तरीसुद्धा त्याच्या आचारविचारातील रानटी अंश काही साफ नष्ट झाला नव्हता. त्याचा लहरी स्वभाव काहीं न्याराच होता! त्याचा अधिकारहि इतका मोटा होता की पुसता सोय नाही. आपल्या अनेक लहरी त्याने अमलात आणल्या होत्या, अगदी आपल्या मर्जीनुसार! बरे, या बाबतीत कुणाशी सल्ला मसलत– त्याचे नावच नको. काय करायचे तें स्वतःच्या लहरी मनाशी ठरवी आणि करून मोकळा होई.

त्याच्या घरी आणि दरबारी अनेक नोकरचाकर होते. ते नेमून दिलेली आपापली कामे तत्परतेने पार पाडीत. त्याच्या कामातला तो सुरळितपणा आणि सफाईदारपणा पाहून राजाला संतोष होई. तो त्याच्या कामावर फार खूप होई. कारण त्याचा स्वभावच मुळी तसा होता. स्वारी मनाने आनंदी आणि वृत्तीने खुशालचेंडू! पण घरगुती किंवा दरबारी कामाकाजात जरा कुठे उभ्याचे आडवे झाले, एखाद्या नोकराचाकराने जरा कुठ वर मान केली की तुम्हाला वाटेल राजेसाहेब खवळून उठत— संतापाने लाल होत? मुळींच नाही. उलट, स्वारी आणखी खूप होई, त्याना अधिक आनंद होई. कारण नाठाळ लोकाना सुतासारखे मऊ करण्यात किंवा वर मान करणाऱ्याना आपल्या पोलादी हाताने दडपण्यात स्वारीला गमत वाटे. त्यातच तो विलक्षण आनंद लुटीत असे.

आता शेजारच्या सुधारकाकडून या राजाने काही खुळ्या कल्पना उचलल्या होत्या. सार्वजनिक सभागृह ही त्यातलीच एक कल्पना. या सभागृहात मानवी आणि पाशवी धैर्याचे प्रदर्शन करून त्याद्वारे प्रजेला शुद्ध व संस्कृत करणारी ही कल्पना राजाने तातडीने अमलात आणली.

पण येथेहि राजाच्या रानटी आणि मोकाट लहरीच साकार झाल्या. राजानें एक प्रचंड सभागृह बांधून तयार केले. पण कशासाठी? मरणोन्मुख लोकाच्या तोंडचे करुणोद्गार लोकाना ऐकता यावेत किंवा धर्म आणि भुकेकंगाल याच्या झगड्यातील पर्यवसान लोकाना कळावें म्हणून नव्हे!

लोकांच्या मानसिक शक्ति विस्तृत व विकसित व्हाव्या म्हणून.

म्हणून या राजानें हे प्रचंड सभागृह उभारलें. चहूबाजूंनीं बैठकीसाठीं गॅलऱ्या बांधल्या. त्याशिवाय भूमिगत कोठड्या ठेवल्या. त्या कोठड्यांचे मार्ग कुणाला दिसत नसत. ही सारी न्यायदानाची काव्यमय व गूढ तयारी होती. येथे अपराध्यांना सजा आणि निरपराध्यांना बक्षिसें देण्यात येत. पण अपराधी आणि निरपराधी ठरवायचे कुणीं? ती जबाबदारी केवळ निःपक्षपाती आणि शुद्ध दैवावर सोपविण्यात आली होती.

राजानें लक्ष घातलेंच पाहिजे इतक्या महत्त्वाच्या बाबतींत जर गुन्हा असेल तर अटक केलेल्या प्रजाजनावर गुन्ह्याचा आरोप ठेवण्यात येई. आणि त्यानंतर अमुक अमुक दिवशीं सदर आरोपीचें भविष्य सार्वजनिक सभागृहांत ठरेल अशा आशयाचा फतवा काढण्यात येई. हें सभागृह राजाच्या नावाला शोभेल असेंच होतें. त्याचें बांधकाम जरी उसनें घेतलें होतें, तरी त्याचा उपयोग मात्र या राजाच्या नामी डोक्यांतूनच निघाला होता.

न्यायदानासाठीं ठरलेल्या दिवशीं तमाम लोक सभागृहाच्या गॅलऱ्यांमध्यें गर्दी करीत. मग राजा आपल्या राजदरबारी मानकऱ्यांसह सभागृहांत हजर होई. त्यानंतर राजाकडून इषारा मिळताच सिंहासनाखालचा दरवाजा सताड उघडा पडे, आणि त्यांतून आरोपी बाहेर येऊन सभागृहाच्या मध्यभागी उभा राही. दुसऱ्या बाजूला आरोपीच्या समोर दोन दरवाजे होते. दोन्ही दरवाजे दिसण्यांत अगदी सारखे आणि शेजारीं शेजारी. या दोन दरवाज्यांपैकी कोणत्याहि एका दरवाज्यापाशीं जाऊन तो उघडण्यास सांगण्यात येई. आरोपीच्या मनाप्रमाणें कोणताहि दरवाजा उघडण्याची त्याला मुभा असे. अमुक दरवाजा त्यानें उघडावा म्हणून कांहींहि करण्यांत येत नसे. त्यानें कोणताहि दरवाजा उघडावा—मग तो आणि त्याचें नशीब! त्यानें एक दरवाजा उघडला कीं त्यांतून भुकेनें व्याकुळलेला एक वाघ अक्राळविक्राळपणें बाहेर येई आणि आरोपीवर झडप घाली. त्याचा अर्थ असा कीं, सदर आरोपीवरील आरोप सिद्ध होऊन तो दोषी ठरला. मग वाघाच्या भक्ष्यस्थानीं पडणें हीच त्याच्या कपाळीं शिक्षा. तो हिंस्र पशु त्या माणसाला फाडून खात असतांना एका

पितळी घंटेचा जोरजोराने घणघणाट होई आणि सभागृहाच्या बाहेर असलेल्या 'दोषी' माणसाच्या नातेवाइकांना शोकात बुडून जाण्याचा इशारा मिळे

पण जर का आरोपीने चुकून दुसरा दरवाजा उघडला—तर? एक अत्यंत सुंदर अशी तरुण सामोरी येई. ही तरुणी त्या आरोपीच्या वयाला व दर्जाला साजेल अशी निवडलेली असे. ही सौंदर्यसम्राज्ञी पुढे येताच आरोपी निर्दोषी आहे असे आपोआपच ठरले जाई, आणि ती तरुणी त्याला बक्षिस मिळे तिच्याशी त्याचे तावडतोब लग्न केले जाई. मग त्या 'निर्दोष' माणसाची पहिली पत्नी व मुले असोत अगर नसोत, किंवा त्याची अन्य एखादी प्रिया असो अगर नसो, राजानें बक्षिस दिलेली ही तरुणी त्याला स्वीकारावीच लागे. इतकेच काय पण तत्काळ त्याच सभागृहात रोखठोक लग्न लावून दिले जाई.

राजाच्या सिंहासनाखालील दुसरा दरवाजा उघडला जाई त्यातून धर्मगुरु येई, त्याच्या पाठोपाठ हर्षभराने फुले उधळीत नर्तिका येत आणि मोठ्या समारंभाने विवाह पार पाडण्यात येई घंटेचा घणघणाट होई लोक आरोळ्या ठोकून आनंद व्यक्त करीत मग तो 'निर्दोषी' आपल्या नवविवाहित पत्नीसह घरी जाण्यास निघे. त्यापूर्वी त्याच्या मार्गावर सुगंधी फुलांच्या पायघड्या पसरलेल्या असत

अशी ही न्यायदानाची अर्धवट पद्धत. या न्यायदानपद्धतींत लाच लुचपतीचा अंश नव्हता हे खरे. कारण कोणताहि दरवाजा उघडण्यास त्याला मोकळीक असे. आणि दरवाजा उघडताना आता या क्षणी आपण वाघाच्या जबड्यात सापडणार आहोत की सुंदर तरुणीच्या मादक मिठीत पडणार याची खुद्द आरोपीलाहि कल्पना नसे. काही वेळा वाघ एका दरवाज्यातून येई, तर काही वेळा दुसऱ्या दरवाज्यातून येई आणि शिक्षा किंवा बक्षिस जे काहीं नशिबात असेल ते तातडीने मिळे. तिथे सबब व सुटका नसे.

हे सभागृह आणि ही न्यायदानपद्धति बरीच लोकप्रिय झाली होती कारण न्यायदान पाहण्यासाठी जमलेल्या जनसमुदाला आपल्या डोळ्या-देखत काय होणार आहे याची पूर्व कल्पना नसे. गोड विवाह पाहायला

मिळेल कीं अंगावर काटा उभा करणारी रक्तलांछित कत्तल पाहायला मिळेल याची लोकाना कल्पना नसे. या अनिश्चितीमुळे लोकाच्या मनाची चागलीच करमणूक होई. शिवाय समाजातील विचारी लोकाना न्यायदान गैर झालें असा आरोप करता येत नसे; कारण येथे तर आरोपीच नाहीं का आपल्या हातानें आपलें भवितव्य ठरवितो ?

या अर्ध-रानटी राजाला एक कन्या होती. ही राजकन्या दिसण्यात सुदर, तेजस्वी आणि राजेशाही होती. राजाचें तिच्यावर आत्यतिक प्रेम होतें. त्यानें तिला अगदी फुलासारखी वाढविली होती. राजाच्याच दरबारातील एका देखण्या पण कमी दर्जाच्या तरुणाचें तिच्यावर प्रेम होतें. तिचेंहि त्याच्यावरच प्रेम होतें कारण तो जसा देखणा होता तसा शूरहि होता. राजकन्येवर प्रेम करणारा नायक नेहमी असाच असतो. राजकन्येचे त्याच्यावर मनापासून प्रेम होते. काहीं अशी ते रानटीहि होते. त्यामुळे त्या प्रेमाला कडवेपणाची छटा चढली होती. हे प्रेम अनेक महिने चालले होते. दोघेहि प्रेमाच्या वातावरणात सुखाने पहुडली होती. पण ते सुख त्याच्या नशिबीं नव्हते.

एकदा या प्रेमाची राजाला खबर मिळाली. एखाद्या कमअस्सल तरुणाने आपल्या मुलीवर प्रेम करावे म्हणजे काय ? राजाला ते खपले नाही. त्याची कर्तव्याची जाणीव तीव्र झाली. त्याने ताबडतोब हुकूम दिला व व तो तरुण तत्काळ तुरुगात डाबला गेला. काहीं दिवसानी सार्वजनिक सभागृहात न्याय देण्याचा दिवसहि मुक्रर करण्यात आला.

हा प्रसग विशेष महत्त्वाचा होता. खुद्द राजा आणि त्याचे प्रजाजन याचे या खटल्याकडे डोळे खिळून राहिले होते, यापूर्वी असा प्रसग कधींहि गुदरला नव्हता. कारण राजकन्येवर प्रेम करण्याचे धाडस यापूर्वी कुणी केले नव्हते.

सार्वजनिक सभागृहात आणण्यासाठी अत्यत रानटी व खवळलेला वाघ शोधण्यात आला. त्याचप्रमाणे या प्रेमी तरुणाला शोभेल अशी तरुणीहि सर्वत्र हुडकण्यात आली. कारण त्या आरोपीचे नशीब असेल तर त्याला योग्य अशी पत्नी मिळाली पाहिजे हा राजाचा हेतु होता.

त्या तरुणावर जो आरोप ठेवण्यात आला होता तो तर सर्वच लोकाना

मान्य होता. कारण त्याने राजकन्येवर प्रेम केले होते. खुद्द तो तरुण, राजकन्या किंवा अन्य कोणीहि ही गोष्ट नाकारू शकत नव्हते. तथापि न्यायदानाच्या पद्धतींत ढवळाढवळ करणे राजाला पसंत नव्हते. अखेर सभागृहात काहीहि का घडेना, राजा ती गंमत रस घेऊन पाहणार होता. राजकन्येवर प्रेम करण्यात त्या तरुणाने चूक केली होती की नाही हे त्यावरून ठरणार होते.

अखेर ठरलेला दिवस उजाडला. अति दुरून दुरून लोक सभागृहात जमा झाले. साऱ्या गॅलऱ्या अक्षरशः फुलून गेल्या. हजारो लोकांना सभागृहात प्रवेश मिळणे कठिण झाले, म्हणून सभागृहाच्या बाहेरच्च मोहोळावरच्या माश्यासारखे लोक झोंबून राहिले राजा आणि दरबारी मानकरी आपापल्या पदावर विराजमान झाले.

सारी तयारी झाली. इशारा मिळाला. सिंहासनाखालचा दरवाजा उघडला गेला, आणि राजकन्येचा प्रियकर सभागृहापुढें आला. उंच, बांध्याने सुंदर व देखणा असा तो तरुण पुढें येताच जमलेल्या लोकांच्या तोंडून दबलेले कौतुकोद्गार बाहेर पडले. अशा तरुणावर राजकन्येने प्रेम केले यात नवल कसले? आणि अशा तरुणाला अखेर सभागृहापुढे यावे लागले! किती हा दुर्धर प्रसंग!

या तरुणाने राजाला वाकून अभिनंदन केले पण त्याच्या मनात मात्र राजा नव्हता. त्याच्या मनाच्या सिंहासनावर राजकन्या विराजली होती. त्याची नजर राजाशेजारी बसलेल्या राजकन्येवर खिळली होती. ती राजकन्या तेथे बसली होती, यावरूनच तिच्यात रानटी अंश होता हे दिसून येते. तसे नसते तर ती राजकन्या हे भयानक दृश्य पाहण्यास तिथे बसू शकली असती का?

आपल्या प्रियकराने सार्वजनिक सभागृहात आपले नशिब ठरवावे अशी राजाज्ञा होताच ती राजकन्या व्याकुळ झाली होती हे खरे. त्या दिवसापासून तिनें दुसरा कोणताहि विचार केला नव्हता.

तिच्या हातीं सत्ता होती, आणि वजन होते. ती सत्ता आणि ते वजन एकवटून तिने सर्व ते प्रयत्न केले. असे प्रयत्न पूर्वी कुणी कुणासाठी

झाले नव्हते. तिने आपले वजन खर्चून आणि सोन्याच्या मोहरा पेरून दोन दरवाज्याचे रहस्य हस्तगत करून घेतले. कोणत्या दरवाज्यामागे वाघ असणार आणि कोणत्या दरवाज्यामागे सुंदर तरुणी असणार हे तिने जाणून घेतले. एवढच नव्हे, तर कोणती सुंदर तरुणी नियुक्त करण्यात आली आहे हहि तिने जाणून घेतले. ती तरुणी इतकी सुंदर होती की तिचा कुणाल्याहि हेवा वाटावा दैवयोगाने राजकन्येचा प्रियकर जर निरपराधी ठरला तर ती सुंदर युवती त्याला मिळणार होती. आणि ती युवती कदाचित् आपल्या प्रियकराची पत्नी होईल या विचाराने राजकन्येच्या मनात असूया निर्माण झाली ती युवती आपल्या प्रियकराच्या नजरेचा खेळ करीत आहे, इतकेच नव्हे तर आपला प्रियकर त्या खेळात रमून गेला आहे, दोघेहि गुजगोष्टी करीत बसली आहेत, अशा तऱ्हेची चित्रे तिच्या मनःचक्षुसमोर तरळू लागली आणि म्हणूनच ती त्या युवतीचा मनस्वी द्वेष करू लागली

राजकन्येचा प्रियकर सभागृहापुढे उभा होता त्याने एकदा वळून राजकन्येकडे पाहिले दोघांची दृष्टिभेट झाली. नजरा एकमेकावर खिळल्या पूर्वसहवासाने दोघांची मनें एक झाली होती त्यामुळे राजकन्येचे मन त्या प्रियकराला समजले. कोणत्या दरवाज्यामागे वाघ व कोणत्या दरवाज्यामागे युवती असणार हे राजकन्येला माहीत असणारच, हे प्रियकराने ताडले तिच्याकडून दरवाज्याचे गुप्त रहस्य आपल्याला मिळेल हे त्याने जाणले. ते रहस्य साऱ्या लोकाना इतकेच काय पण खुद्द राजालाहि अज्ञात होते

राजकन्येच्या दृष्टीवर प्रियकराची दृष्टि ठरताच प्रियकराला कळून चुकले की दरवाज्याचे रहस्य तिला माहीत आहे, आणि ते रहस्य तिच्याकडून कळताच आपण यशस्वी होऊ अशी आशा त्या प्रियकराला वाटू लागली.

आणि केवळ नजरेच्या हालचालीने त्याने राजकन्येला प्रश्न केला— "कोणता दरवाजा?" जसा काही मोठ्याने ओरडून त्याने प्रश्न विचारला होता. आता फुकट घालविण्यासाठी एकहि क्षण नव्हता. आणि त्याच वेगानें त्याला उत्तर हवे होते.

तिने आपला उजवा हात उचलला आणि किंचित् उजवीकडे वाकून तिने उजवीकडे खूण केली. ही खूण त्या प्रियकराशिवाय इतर कुणाच्याहि नजरेत आले नाही. साऱ्याच्या नजरा त्या प्रियकरावर जखडून बसल्या होत्या.

प्रियकर दरवाज्याकडे फिरला आणि गंभीरपणे त्याने दरवाज्याप्रत पावले टाकली. आपल्या हृदयाची धडधड आता थांबते की काय असे जमावातील प्रत्येकाला वाटू लागले प्रत्येकाने श्वास रोखला प्रत्येकाची नजर बद्धिस्त झाली

आता काय झाले असेल? त्या उघडलेल्या दरवाज्यातून कोण बाहेर आले? वाघ? की सुंदर युवती?

या प्रश्नाचे उत्तर देणे कठीण! या प्रश्नाचे उत्तर देण्यापूर्वी मानवी स्वभावाची आपण ओळख करून घेतली पाहिजे. मानवाच्या आशा, आकांक्षा, असूया यांचा विचार केला पाहिजे त्यांचा विचार करा या प्रश्नाचे उत्तर तुम्हीच दिले पाहिजे म्हणून विचार करू नका. तर ती अर्धरानटी व खुनशी राजकन्या, निराशा आणि असूया यांच्या अग्नीत होरपळत असलेला राज्यकन्येचा आत्मा यांचा विचार करा. तो प्रियकर तिला मिळणारच नव्हता. मग तो कोणाला मिळावा असे तिला वाटले असेल?

आपला प्रियकर दुसरा दरवाजा उघडून क्रूर वाघाच्या भुकेल्या जबड्यापुढें उभा आहे, असे भयानक दृश्य कितीदा तरी जागेपणी आणि स्वप्नात राज्यकन्येच्या दृष्टीसमोर तरळलें होते. आणि घाबरून तिने आपल्या थरथरत्या हाताने आपले तोंड लपविले होते.

—आणि अनेकदा तिने दुसरेहि दृश्य पाहिले होते तो प्रियकर दुसऱ्या दरवाज्यासमोर उभा आहे. तो दरवाजा त्याने उघडला आहे. यातून पुढे आलेली सुंदर युवती त्याच्यासमोर उभी आहे. तो तिला आलिंगन देण्यासाठी पुढे सरसावतो आहे त्या युवतीच्या गालावर गुलाब फुलले आहेत. तिची नजर विजयाने धुंद झाली आहे लोक हर्षाने आरोळ्या ठोकीत आहेत घंटाचे घणघणाट आनंदात भर घालीत आहेत. धर्मगुरु आला आहे. नर्तिका नाचत आहेत. सुकुमार

फुलाच्या पायघड्या पसरल्या जात आहेत. आणि हे सारे तिच्या डोळ्या देखत होते आहे. हे दृश्य डोळ्यासमोर येताच तिने करकरून दात चावले, केस ओरबाडले. सारी कुडी जळून भस्मसात् होते आहे असे तिला वाटले. या धगधगत्या जाचात तिचे हृदय होरपळू लागले.

—त्यापेक्षा त्याने मरावें आणि आपली वाट पाहात कुठे तरी स्वर्गात बसावे हेंच अधिक सयुक्तिक नाही का?

—तो भयकर वाघ, त्याच्या भयाण डरकाळ्या आणि तो रक्ताचा सडा!

तिचा निर्णय त्याच क्षणी अमलात आला होता. कित्येक दिवस आणि कित्येक रात्री हा सघर्ष तिच्या मनात चालू होता. आणि त्या दीर्घ सघर्षा नतरच तिच्या मनाने हा निर्णय घेतला होता. सभागृहापुढे उभा असलेला प्रियकर आपल्याला हा प्रश्न विचारणार हे ती जाणून होती आणि म्हणूनच तिने हा विचार आधीच पक्का करून ठेवला होता. आणि त्या विचारा-नुसार तिने उजवीकडे खूण केली होती.

तिच्या निर्णयासबंधीच्या प्रश्नाचा उडत्या मनाने विचार करून चालणार नाही त्या प्रश्नाचे योग्य उत्तर मला देता येईल असे मी समजणेहि रास्त नव्हे. म्हणून उत्तरासाठी तो प्रश्न मी तुमच्यावरच सोपवतो. तुम्हीच सागा—प्रियकराने उघडलेल्या दरवाज्यातून कोण बाहेर आले? वाघ की युवती?

❦ ❦ ❦

# ७. सप्रेम भेट

## ओ. हेन्री

ओ. हेन्री (१८६२–१९१०) या टोपण नांवाने लिहिणाऱ्या विल्यम सिडने पोर्टर या प्रख्यात कथा-लेखकाचा जन्म ग्रीसबॉरो, उत्तर कॅरोलिना येथे झाला. ओ. हेन्री हे तंत्रकुशल कथालेखक असून त्यांनी आपल्या कथांतून सलग्न जीवनाचे दर्शन घडविण्या-ऐवजी विशिष्ट अर्थपूर्ण घटनांचे दर्शन घडविले. त्याचा दृष्टिकोन उपरोधक असला तरी कडवट नसतो. त्यांनी निर्माण केलेल्या व्यक्ति वाचकाला साध्यासुध्या आणि परिचयाच्या वाटतात. कथेच्या शेवटीं सुंदर कलाटणी देणे हे ओ. हेन्री यांचे वैशिष्ट्य. त्यामुळे गी द मोपसॉं याच्याशी त्यांची तुलना करतात. आपल्या आयुष्यात त्यांनी सुमारे ६०० ललित लेख आणि

अनेक कथा लिहिल्या १९०४ मध्येच त्यानी ६५ कथा लिहिल्या.

ओ हेन्री याच्या मृत्यूनतर आठ वर्षातच सोसायटी ऑफ आर्ट्स ॲन्ड सायन्सेस या संस्थेने त्याचे स्मारक केले. या स्मारकातर्फे दरवर्षी एका सर्वोत्कृष्ट अमेरिकन लघुकथेस बक्षिस दिले जाते



एक डॉलर आणि सत्त्यायशी सेंट्स! बस् एवढेच! आणि त्यातहि साठ सेंट्सची नुसती चिल्लर. वाणी, भाजीविक्या, खाटीक याच्याशी घासाघीस करून आणि 'चिक्कू मारवाडी आहे बाई' असे ते म्हणत असतील ही रुखरुख सहन करूनहि जमविलेली ती चिल्लर! — डेलाने आपली पुंजी तीनदा मोजली — तरीहि एक डॉलर नि सत्त्यायशी सेंट्स! अन् नाताळ तर उद्या!

अशा वेळी घरच्या ओंगळवाण्या खाटेवर अंग टाकून मुसमुसत रडणे हा एकच मार्ग, आणि डेलानेहि तोच मार्ग अनसरला. हे जीवन म्हणजे दुसरे तिसरे तरी काय?— हुंदके, उसासे आणि हास्य - आणि त्यातहि उसासेच अधिक!

आता घरधनीण आपले हुंदके आवरते आहे, तावर हवी तर या घरावर ओझरती नजर टाका. काय दिसते? हा गाळा. सामानसुमाना सकट याचे आठवड्याला आठ डॉलर भाडे. याचे वर्णन करताना भाषा भिकारडी ठरेल असेल नाही. पण वर्णनातील विशेषणासाठीं मात्र भिकाऱ्याकडेच पाहावे लागेल.

या खालच्या बोळात ही पत्राची पेटी. पण त्यात कधी पत्र शिरेल तर शपथ! आणि हे विजेच्या घंटीचे बटण. पण ती घंटा वाजलेली मात्र कधी कुणी ऐकलेली नाही! त्याच्यावर नावाची पाटी होती—"मि. जेम्स डिलिंगहॅम यंग"

भरभराटीच्या काळात त्या पाटीच्या मालकाला—डिलिंगहॅमला—आठवड्याला तीस डॉलर मिळत होते तेव्हा ती पाटी लटकावली गेली होती. आता त्याचे उत्पन्न विसावर आले आहे. त्यामुळेच की काय त्या पाटीवरली अक्षरे सडू लागली होती. होता होता शेवटी 'डी' हे एकच अक्षर उरणार की काय असे वाटत होते. पण म्हणून दोघांच्या प्रेमात कमतरता होती का? छे—जेम्स डिलिंगहॅम परतला आणि घरी पोंचला म्हणजे त्याची बायगो डेला त्याला 'जिम' अशी हाक मारी आणि प्रेमा-भरानें आलिंगन देई

—आता डेलाने आपले हुंदके आणि उसासे संपविले होते. गालावर

ओघळलेले अश्रु तिने पुसले, तोंडावर पॉवडरचा हात फिरवला आणि ती खिडकीला रेलून उभी राहिली. आपली मद आणि निर्जीव नजर तिने चौफेर फिरवली. आवारातील गाडग्यावर एक मांजर चालत होते. ते माजर, तो गडगा आणि ते आवार—सारे तिला गलिच्छ दिसले.

उद्या नाताळचा सण. 'जिम'ला एखादी भेट द्यायला हवी. पण हातात तर अवघे एक डॉलर आणि सत्त्यायशी सेंट्स. आज कित्येक महिने ती पै पै करून पैसे राखीत होती. पण तरीहि एवढीच शिल्लक. आठवड्याला मिळणार वीस डॉलर—त्यात काय काय करणार? अंदाजापुढे खर्चाची दौड. आणि तेंहि ठरलेलेच म्हणा. 'जिम'ला भेट देण्यासाठी आता फक्त एकच डॉलर अन् सत्त्यायशी सेंट्स! जिम—जिम म्हणजे तिचा प्राण. जिमला एखादी छानशी भेट घेऊन द्यावी असा तिने बेत रचला होता, आणि असे बेत रचण्यात तिनें कितीतरी गोड घटका अनुभवल्या होत्या. उत्तम दुर्मिळ वस्तु—जिमला आवडेल अशी वस्तु—त्याला भेट द्यायची असा तिचा विचार होता.

खोलीतील खिडक्याच्या मधोमध भिंतीवर एक आरसा होता. आठ डॉलर भाड्याच्या घरात कसले आरसे असतात हे तुम्ही कदाचित् पाहिले असेलच. त्या आरशात शरीराचा थोडा भाग दिसायचा. आणि एखाद्या सडपातळ माणसाला आपली अर्धवट दिसणारी प्रतिबिंबे त्याने कल्पनेंत एकत्र केली तरच आपण कसे दिसतो याची कल्पना यायची. डेला सड-पातळ होती. आणि तिला ही कलाहि अवगत झाली होती.

एकदम डेला खिडकीपासून वळली, आणि आरशासमोर उभी राहिली तिचे डोळे चमकत होते. पण तिचा चेहरा मात्र दुसऱ्याच क्षणीं साफ उतरला. तिने आपले लांब सडक केस मोकळे केले आणि पाठीवर रुळू दिले.

जेम्स डिलिंगहॅम यंगचा संसार गरिबीचा खरा. पण यंग पतिपत्नींना दोन गोष्टींचा भारी अभिमान वाटायचा. एक जिमच्या आजोबापासून चालत आलेले सोन्याचें घड्याळ, आणि दुसरी गोष्ट म्हणजे डेलाचे लांबसडक केस. समजा, समोरच्या घरात शेबा देशाची राणी राहात असती आणि तिचा हिऱ्यामोत्याचा दिमाख उतरायचा असता, तर डेला खिडकीपाशीं आपले केस वाळवीत राहिली असती तरी पुरे झाले

असते ! आणि सॉलोमन राजाचा सपत्तीचा तोरा घालविण्यासाठी जिमनें जाता येता आपले घड्याळ खिशातून बाहेर काढले असते तरी राजाला हेवा वाटू लागला असता आणि तो मान खाली घालून दाढी खाजवू लागला असता.

डेलाने सुटे सोडलेले केस खळाळणाऱ्या पिंगट जलधारासारखे चमकू लागले. ते इतके लाबसडक होते की ते तिच्या गुडघ्याना भिडले, आणि एखाद्या वस्त्रासारखे त्या केसानी तिचें अग झाकले. लगेच ती बावरली आणि झटपट आपले केस बाधू लागली, मध्येच थबकली, तशीच उभी राहिली आणि खळकन् दोन अश्रू तिच्या डोळ्यातून निखळले आणि पायाखालच्या जीर्ण लाल सतरजीवर विरले.

झटपट तिने पिंगट रगाचे जाकीट अगावर चढविले, जुनी हॅट डोक्या वर ठेवली आणि झग्याचे पख फडफडवीत एखाद्या भिंगरीसारखी ती रस्त्यावर आली. तिच्या डोळ्यातील चमक मात्र अद्याप तशीच होती.

ती थाबली एका दुकानापाशी. दुकानावरील पाटी तिने वाचली. "मादाम साफ्रोनी. सर्व तऱ्हेची गगावने" एका उडीत डेला दुकानात चढली, स्वतःला तिने सावरले आणि धापा टाकीत ती उभा राहिली मादाम खूप गलेलठ्ठ आणि पाढरी फटफटीत होती. ते ध्यान पाहिले की तिचे 'साफ्रोनी' हे नाव नावापुरतेच होते हे लक्षात येई.

"माझे केस तुम्ही विकत घ्याल का?" डेलाने विचारले.

"हो, तुमची हॅट काढा बघू ! केस कसे आहेत ते पाहू दे मला" मादाम म्हणाली.

डेलाचे लाबसडक केस खाली खळखळले. जणू जलधाराच कोसळल्या. मादामने अस्सल व्यापाऱ्याच्या थाटात ते केस हाताने उचलून पाहिले आणि ती म्हणाली, "वीस डॉलर."

"द्या—द्या लवकर," डेला अधीरतेने म्हणाली.

वीस डॉलर घेतले आणि नतरचे दोन तास डेला अक्षरशः गुलाबाच्या पाकळ्यावरून फिरली. ह, शिळीच उपमा ! मुद्दा एवढाच की, जिमची भेट खरेदी करण्यासाठी ती दुकानामागून दुकानें धुडाळीत होती.

वाः छान ! किती सुंदर ! ही वस्तु म्हणजे जिमसाठीच आहे. दुसऱ्या कोणालाहि शोभणार नाही अनेक दुकानातील नाना वस्तु तिने उलथ्यापालथ्या केल्या होत्या पण यासारखी वस्तु हीच. ती वस्तू म्हणजे खिशातील घड्याळाची प्लॅटिनमची साखळी ती साधी पण सुंदर होती केवळ वरची कलाकुसरत नव्हे तर मूळ माल पाहताच किंमतीची कल्पना यावी. आणि सर्व चांगल्या वस्तूंचे हे असेच असते. आणि ती साखळी तरी कशी ? अगदी जिमच्या घड्याळाला शोभेशी. त्या साखळीवर नुसती नजर जाताच डेलाच्या मनाने ठरवून टाकले की ही साखळी जिमच्या घड्याळाला लटकलीच पाहिजे आणि ती साखळीहि जिमसारखीच अगदी शांत व गुणी त्या साखळीची एकवीस डॉलर किंमत देऊन डेला घाईघाईने घरी परतली तेव्हा तिच्याकडे फक्त सत्त्यायशी सेंट्स शिल्लक होते ही साखळी जिमच्या घड्याळाला अडकवली की चारचौघांच्यासमोर घड्याळ बाहेर काढून वेळ बघण्यास जिम नेहमीच आतुर होईल ते घड्याळ किती सुंदर होते ! पण त्याला साखळी नव्हती तिच्याऐवजी एक जुना चामडी पट्टा होता त्यामुळे हे घड्याळ सुंदर असूनहि जिमला त्याकडे चोरून पाहावे लागे

डेला घरी येताच मात्र तिची धुंदी थोडी ओसरली. तिने अमळ विचार केला आणि आपली सौंदर्यप्रसाधने जमविली प्रेमातील औदार्याच्या भरात तिने आपले केस कापले होते ती उणीव निस्तरण्यासाठी ती धडपडू लागली केस कुरळे करण्यासाठी तिने पिना काढल्या कारण हे काम दिसते तेवढे काही सोपे नाही.

चाळीस मिनिटांच्या अवधीत डेलाच्या मस्तकावर कुरळ्या बटा दिसू लागल्या. तिने आपले रूप आरशात पाहिले तेव्हा ते तिला अवखळ शाळकरी पोरीसारखे दिसले. आपले रूप तिने आरशामध्ये बराच वेळपर्यंत काळजीपूर्वक आणि चोखंदळपणे पाहिले

" जिमने पहिल्या दृष्टिक्षेपातच मला ठार न मारता जर पुन्हा माझ्याकडे पाहिले तर तो म्हणेल की, मी तमाशातली पोर दिसते म्हणून. पण मी तरी काय करणार ? एक डॉलर नि सत्त्यायशी सेंट्स कशासाठी म्हणून पुरणार ? " डेला स्वतःशीच पुटपुटली.

बरोबर सात वाजता कॉफी तयार झाली. आणि चॉप शिजविण्यासाठी तवा स्टोव्हवर चढविला.

जिम कधी उशिरा येत नसे घड्याळाच्या साखळीची घडी करून डेला ती घट्ट मुठीत धरून दरवाज्याजवळील टेबलाच्या कोपऱ्यात बसली त्याच बाजूने जिम नेहमी आत येई जिन्याच्या पायरीवर जिमने टाकलेल्या पहिल्याच्च पावलाची चाहूल डेलाच्या कानावर आली, आणि क्षणभर तिचा चेहरा गोरामोरा झाला. साध्यासुध्या दैनंदिन गोष्टी बद्दलसुद्धा कधी कुजबुजली नसेल इतक्या हलक्या आवाजात ती देवापाशी कुजबुजली. "देवा, मी आताहि तशीच दिसते असे त्याला वाटू दे!"

दरवाजा उघडून जिम आत आला, आणि त्याने दरवाजा बंद केला. तो थकलेला आणि गंभीर दिसला गरीब बिचारा! अवघ बावीस वर्षांचे वय—पण माथ्यावर कुटुंबाचे ओझे! त्याला आता एक नवीन ओव्हर-कोट हवा!—आणि त्याच्या हातात हातमोजे तरी कुठे आहेत!

जिम आत आला आणि टोकळ्यागारखा उभा राहिला. त्याचे डोळे डेलावर खिळले होते. त्याच्या नजरेतील भाव मात्र तिला कळत नव्हते, आणि त्यामुळे ती अधिकच भयभीत झाली होती. त्या नजरेत राग नव्हता, विस्मय नव्हता, नापसती नव्हती किंवा भीति नव्हती. ज्याच्या साठी ती तयार होती असा कोणताहि भाव तिला त्या दृष्टीत दिसेना त्याचे डोळे फक्त तिच्यावर खिळले आणि विक्षिप्त नजरेने तो तिला न्याहाळू लागला.

डेला टेबलावरून उठली आणि जिमपाशी गेली.

"जिम," ती म्हणाली, "असा रोखून नको पाहूस माझ्याकडे मी केस कापून विकले आहेत. कारण तुला नाताळची भेट दिल्याशिवाय मला राहवले नसते. आणि हे केस झटदिशी वाढतील तुला राग नाही ना आला? मला तसे करण्याव्यतिरिक्त गत्यतर नव्हते. माझ्या केसाची वाढसुद्धा भलतीच आहे. जिम, 'मेरी खिसमस' म्हण पाहू. आपण आता थोडा आनद लुटू. तुझ्यासाठी मी किती सुदर भेट आणली आहे हे तुला माहीत नाही."

"तू तुझे केस कापलेस?" जिमनें मोठ्या कष्टानें विचारलें जणू तिनें केस कापले या गोष्टीवर त्याचा विश्वासच बसत नव्हता.

"केस विकले!" डेला म्हणाली. "पण मी पूर्वीसारखीच नाहीं का ठाकठीक दिसत?"

जिमनें जिज्ञासापूर्वक खोलीत दृष्टि फिरवली.

"तुझे केस गेले म्हणतेस?" जिमनें खुळ्यासारखा चेहरा करून विचारलें.

"तू केसासाठी इथे तिथे पाहू नकोस," डेला म्हणाली. "मी ते केस विकले. हा नाताळचा सण आहे. रागावू नकोस, माझे केस मीं तुझ्यासाठीच विकले. माझ्या डोक्यावरचे केस कमी झाले असतील म्हणून काय माझे तुझ्यावरील प्रेम कमी झाले आहे? मी चॉप तव्यावर टाकू का?"

जिम आता शुद्धीवर आला. आणि त्याने डेलाला आपल्या बाहु पाशात धरलें. आता आपण तिथे न पाहता थोडे इतरत्र पाहणे बरे.

ओव्हरकोटाच्या खिशातून जिमने एक पाकीट बाहेर काढले आणि ते टेबलावर अलगत फेकले.

"डेल, माझ्याबद्दल गैरसमज करून घेऊ नकोस. केस कापण्यामुळे माझी डेला काही कमी सुंदर दिसणार नाहीं. पण तू ते पाकीट उघडलेस तर तुला माझी परिस्थिति कळून येईल." जिम म्हणाला.

डेलाच्या नाजुक आणि गौर बोटानी पाकिटावरला दोरा आणि कागद दूर केला आणि काय? आनदातिशयाने तिचे हृदय उचंबळून आले. आणि दुसराच क्षण! तिच्या डोळ्यातून आसवे खळखळू लागली. स्त्रियाच्या बाबतींत हे काहीं नवीन नाही. अश्रू आवरण्यासाठी अखेर जिमला नाना उपाय योजावे लागले.

कारण त्या पाकिटात फण्याचे जोड होते. ब्रॉडवे दुकानाच्या कपाटात ते जोड–ते फण्याचे जोड–तिने पाहिले होते आणि ते तिच्या मनात भरले होते. किती सुंदर होत्या त्या फण्या! त्यावर कासवाचे कवच होते. आणि सुंदर मणी होते. त्याची किमतहि भारी होती. त्यामुळे त्या आपल्या

नशिबी नाहींत हे ती जाणून होती. म्हणून ती फक्त त्या फण्याकडे दुरूनच पाही. आता त्या फण्या तिच्या मालकीच्या झाल्या होत्या. पण ज्या केसाना त्या फण्या शोभा देणार होत्या, ते केसच मुळी ठिकाणावर नव्हते.

तिनें त्या वस्तू हृदयाशी धरल्या. मद नजरेने तिने जिमकडे पाहिले. तिच्या ओठावर हास्य चमकले आणि ती म्हणाली, "माझे केस जलद वाढतात, जिम!"

जिमने अद्याप त्याच्यासाठी आणलेली भेट पाहिली नव्हती. तिने ती साखळी हाताच्या तळव्यावर धरून जिमसमोर धरली त्या साखळीची धातु एरव्हीं मद खरी. पण डेलाच्या उत्साहाने आणि आनदाने तीहि चमकल्यासारखी दिसली.

"किती छान आहे, नाही जिम? या साखळीसाठी मी सबध शहर पायाखाली घातले. तुला आता दिवसातून शभर वेळा तरी घड्याळ काढून वेळ पाहायला हरकत नाही. तुझे घड्याळ दे पाहू त्या घड्याळाला ही साखळी कशी दिसते पाहू"

घड्याळ काढून देण्याऐवजी जिम कोचावर कोसळला. आपले हात त्याने मानेमागे घेतले आणि तो मदपणे हसला.

"डेल," जिम म्हणाला, "आता थोडा वेळ आपण या नाताळच्या भेटी दूर ठेवू या. त्या इतक्या सुदर आहेत की त्या आत्ताच न वापरलेल्या बऱ्या! माझ्या घड्याळाला साखळी घेता यावी म्हणून तू आपले केस विकलेस. तुझ्यासाठी फण्या घेता याव्या म्हणून मी माझे घड्याळ विकले. आता—आता तू चॉप तव्यावर टाक पाहू!"



# ८. विजयी मानव

## स्टीफन व्हिन्सेन्ट बेनेट

स्टीफन व्हिन्सेन्ट बेनेट (१८९८–१९४३) हे अमेरिकेच्या अग्रगण्य लेखकात मोडतात. ते कवीहि होते. अमेरिकन यादवीवर 'जॉन ब्राऊन्स बॉडी' या नावाचे त्यानी जे एक शाहिरी महाकाव्य रचले त्याला १९२९ साली पुलिट्झर पारितोषिक मिळाले. शाहिरी थाटाच्या काव्यात वा लोककथातच बेनेट याच्या उज्ज्वल प्रतिभेचा साक्षात्कार घडतो. किंबहुना त्याच्या लोककथाहि शाहिरी गद्यकाव्य ठराव्यात.

'विजयी मानव' या कथेला अमेरिकेच्या अभिजात वाङ्मयात स्थान मिळालेले आहे. उदयकालीन अमेरिकेतल्या न्यू इंग्लंड राज्यात भोळ्या प्युरिटनांत अशी सार्वत्रिक समजूत रूढ होती की, कधी कधी प्रत्यक्ष

सैतान माणसाचे रूप घेऊन येतो व उद्योगशील लोकांना आपल्या जाळ्यात ओढतो. या गोष्टीत बेनेटनी सदर सैतानाविरुद्ध, मोठ्या कल्पकतेने व चातुर्याने अमेरिकेचे एक मुत्सद्दी व अत्यंत कीर्तिमान् असे वक्ते डॅनियल वेब्स्टर याना उभे केले आहे. डॅनियल वेब्स्टर (१७८२ ते १८५२) हे १८२७ साली सिनेटर म्हणून निवडून आले. ते एक महान् वकील होते व 'अमेरिकन घटनेचे नि संघराज्याचे समर्थक' अशी सार्थ पदवी त्याना प्राप्त झाली होती.



सरहद्दीच्या प्रदेशातून ही गोष्ट सागतात. इथे मॅसॅच्युसेट्स राज्याची सीमा व्हरमॉट व न्यू हॅम्पशायर राज्याच्या सीमेला भिडते. होय! डॅनियल वेब्स्टर आज मृत झाले आहेत. निदान त्याचे दफन झालें एवढें खरे. पण जेव्हा जेव्हा मार्शफील्डभोवतीं विजा कडकडून वादळ होते तेव्हा तेव्हा आकाशाच्या पोकळीतून, लोकाच्या म्हणण्याप्रमाणें, त्याचा आवाज घुमू लागतो.

लोकहि असे सागतात की, तुम्ही जर कधी काळी त्याच्या कबरीपाशी गेलात आणि 'डॅनियल वेब्स्टर', 'डॅनियल वेब्स्टर' अशी स्पष्ट, मोठ्या आवाजात त्याना हाक मारलीत तर पायाखालची जमीन हादरायला लागेल, वृक्षवेली कापू लागतील, आणि मग काही पळानी खोल आवाजांत कुणीतरी तुम्हाला विचारील, "काय मित्रा, सघराज्याचा ससार नीट उभा आहे ना?" पूर्वीप्रमाणेच हे सघराज्य खडकावर उभे असून आजहि ते ताब्याचे कवच ल्याले आहे, ते एकसघ आहे, अविभाज्य आहे— असे तुम्ही सागायला पाहिजे. नाहीं सागितलेत तर भरलीच तुमची घटका! अशा वेळीं जमीन दुभगेल आणि ते भूमीतून एकदम प्रकट होतील. मी बच्चा होतो तेव्हा निदान मला तरी असे सागितले जायचे.

तेव्हा तुम्हाला कळले काय? या राष्ट्रातील ते सर्वात महान् पुरुष होते. ते कधीच अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष झाले नाहीत. पण म्हणून काय झाले? ते पुरुषश्रेष्ठ होते यात काहीं सशय नाही. ईश्वराच्या खालोखाल त्याच्यावर हजारोची निष्ठा होती. आणि लोक आपल्या मूळ कुलपुरुषा विषयी ज्या भक्तिभावाने कथा सागतात तशा त्याच्याविषयीं सागत असत.

लोक म्हणायचे, जेव्हा ते बोलायला उभे राहात तेव्हा आकाशात (अमेरिकन राष्ट्रध्वजावरील) तारे नि पट्टे झगमगू लागत एकदा तर त्यानी कुठल्यातरी नदीचा धिक्कार केला अन् ती नदीच भूमीच्या उदरात लुप्त झाली.

डॅनियल वेब्स्टर हा अशा तऱ्हेचा एक मानव होता. मार्शफील्ड-मधील त्याची मोठी शेतीवाडीहि त्याना साजेशीच होती. त्याच्या खुराड्यातील कोंबडीची पिले म्हणजे पाढऱ्या शुभ्र लुसलुशीत मासाचे गोळेच. घरच्या मुलाप्रमाणेच ते आपल्या गाईची निगा राखीत. आणि

गोलिॲथ नावाचा जो त्याचा एक मोठा मेढा होता त्याच्या डौलदार व बाकदार शिंगाचे सौंदर्य तर काय वर्णावे! सकाळच्या सोनेरी वैभवात माडवावर वळसे घेत चढलेली द्राक्षवेल जशी दिसते तशी ही शिंगे दिसायची. चागल्या लोखडी दारानाहि ही शिंगे धडका देत.

पण डॅनियल हे काही शहरी सस्कार झालेल्या तुमच्या सुखवस्तु शेतकऱ्याच्या जातींतले नव्हते. जमिनीच्या स्वभावाच्या छटा न् छटा त्याच्या परिचयाच्या झाल्या होत्या. झुजूमुजू होत असता, मिणमिणत्या मेणबत्तीच्या प्रकाशात उठून ते कामाला लागत. जिवणी व तोड यावरून ते मॅस्टिफ जातीच्या कुत्र्याप्रमाणे तिखट दिसत. पर्वतासारख्या त्याच्या भुवया होत्या आणि त्याच्या डोळ्यात इगळ्या पेटलेल्या असायच्या. ऐन जवानीत डॅनियल वेब्स्टरचं हे असे ध्यान होतं.

त्यानी लढविलेला सर्वात मोठा दावा लेखी कागदपत्राच्या स्वरूपात कधींच प्रसिद्ध झाला नाही. कारण प्रत्यक्ष सैतानाविरुद्ध त्यानी आपला हा दावा लढविला. हे प्रतिपादन करताना त्यानी आपली शर्थ केली. सैतानाचा पायाच उखडून काढला म्हणतात. यासबधी त्याच्याविषयी लोकाना बोलताना मी ऐकायचा तो पुढीलप्रमाणे :

न्यू हॅम्पशायरमध्ये क्रॉस कॉर्नर्स नावाचा जो भाग आहे तिथली ही गोष्ट. या ठिकाणी जेबेझ स्टोन नावाचा एक इसम राही. आता, जेबेझ स्टोन तसा काहीं वाईट मनुष्य नव्हता. पण बिचाऱ्याशी दैवानं दुःस्वास केला होता. त्याने मका लावला त्याच्यावर कुठं कीडच पडे, आणि त्यानं जर बटाटे लावले तर तेहि ताब्र पडून नष्ट होत. त्याची जमीन तशी काही वाईट नव्हती. पण काही केल्या ती त्याच्या बऱ्यावर नव्हती हेच खरे. सुशील पत्नी व मुले असा त्याचा ससार होता. पण अधिकाधिक मुलाबरोबर त्याना पुरेसे खायला कसे घालायचे ही समस्या निर्माण झाली. शेजाऱ्याच्या शेतात लहानमोठे दगडगोटे सापडले तर नेमके याच्याच शेतात मोठमोठे धोंडे सापडायचे. आपला घोडा नवीन नसला तर तो नवीन घोडा विकत घ्यायचा. पण या नव्या घोड्याची अवस्था पाहावी तर अधिकच करुणाजनक! पायानी लुळे असलेले हे जनावर मटकन् थपकल मारून बसे व मान खाली टाकी. आणि असे की, यासाठी त्याने

अधिक पैसे मोजलेले असायचे. काही काही जण असे कर्मदरिद्रीच असतात बिचारे . पण एके दिवशी जॅबेझ स्टोनच्या सहनशक्ती-पलिकडे गेले

एके दिवशी सकाळींच तो आपली जमीन नांगरीत होता. पण काय झाले की, फाळ खडकाला लागला आणि मोडला. आदल्या दिवशीं हा खडक खचित त्या जागी नव्हता, जॅबेझने शपथेवर या गोष्टीचा निर्वाळा दिला असता. जॅबेझ त्या मोडक्या फाळाकडे पाहात राहिला असता जुवापासून दूर झालेला घोडा एकमारखा खोकू लागला—रेकू लागला. घोड्याच्या आजाराचें हे एक नवें संकट होतें उद्भवत. घोड्याच्या डॉक्टरच्या आमंत्रणाचें हे सूतउवाच होतें. घरात दोन मुलांना गोवरें आले होतें. बायकोहि बिछान्याला खिळली होती आणि इकडे स्वतः जॅबेझच्या हाताच्या अंगठ्याला नखुरडें झाले होतें. जॅबेझच्या पाठीवरची ही अखेरची काटकी होती म्हणानात! आणि आता तो वाकून मोडायला आला होता. त्याच अगतिकतेत तो आपल्याशी म्हणाला, "आता अगदी हद्द झाली. यापेक्षा सैतान पुरवला. दोन सेन्टना त्याला माझा आत्मा विकण्याची माझी तयारी आहे."

हे तो आपल्यापाशींच म्हणाला खरा. पण त्याला काहीं तरी चमत्कारिक वाटू लागले. तथापि जॅबेझ न्यू हॅम्पशायरचा अस्सल रहिवासी होता. बोललेले शब्द गिळण्याचा न्यू हॅम्पशायरवाल्याचा बाणा नव्हता. मात्र जशी संध्याकाळ झाली आणि आपण जे काहीं म्हणालो त्याची तशी काही इंडेपिंडेची बाधा आपल्याला होणार नाही असे जेव्हा त्याच्या मनात आले, तेव्हा त्याला थोडेसे हायसे वाटल्यावाचून राहिलें नाहीं. कारण, जॅबेझ हा एक धार्मिक प्रवृत्तीचा माणूस होता.

यानंतर दुसऱ्या दिवशींची गोष्ट. सायंकाळी जेवायच्या वेळेच्या सुमाराला एका सुंदरशा बग्गीतून कुणी तरी जॅबेझ स्टोनची चौकशी करीत आला. तो मृदुभाषी होता अन् त्याने गडद रंगाचे कपडे घातले होते.

जॅबेझने आपल्या कुटुंबात या माणसाविषयी माहिती दिली ती अशी कीं, तो कुणी वकील असून एका वारस-प्रकरणात आपणाला भेटायला आला होता. पण हा खरा कोण हे स्वतः जॅबेझला मात्र चांगलें कळलें होतें.

या अपरिचिताची नजर काहीं त्याला आवडली नाहीं. तसेंच त्याचें दात विचकून हसणेहि. हे दात पाढरे शुभ्र होते आणि भरपूर होते. काहीं जणांच्या म्हणण्याप्रमाणे दाताच्या दोन्ही फळ्या जिथे एकत्र जुळत तिथे अणकुचीदार टोके तयार झाली होती. कोण जाणे खरें काय ते! जॅबेझच्या कुत्र्यानें या अपरिचिताकडे एक कटाक्ष टाकला मात्र—तगड्यात शेपूट घालून ते श्वापद रडल्यासारखे भुकत धूम पळाले. जॅबेझनें हेहि पाहिलें.

पण जॅबेझनें एकदा शब्द दिलेला असल्यानें आता त्याला त्या शब्दाशीं बेइमान व्हायचें नव्हते. अखेर दोघेहिजण घराबाहेर गोठ्याच्या मागच्या बाजूला गेले व तिथे त्यानीं सौदा केला. त्या अपरिचितानें जॅबेझला एक चादीची टाचणी दिली. या टाचणीने बोटाला रक्त काढून त्या रक्तानें जॅबेझनें विक्रीपटावर सही केली. ती जखम अर्थात् बरी झाली. पण तेथे एक लहानसा पाढरा व्रण राहिला.

यानतर मात्र अकस्मात्पणें जॅबेझ स्टोनच्या नशिबाचे चक्र जें एकदम फिरलें ते सरळ भरभराटीच्या मार्गाला लागले. त्याच्या गाई चागल्या पुष्ट झाल्या. घोडे तुकतुकीत दिसायला लागले. आसपासच्या लोकाना त्याचा हेवा वाटावा असे पीक त्याच्या शिवारात डोलू लागले. सबध खोऱ्यात जरी वीज पडली आणि कुणाकुणाच्या घरादारावरून जरी नागर फिरला तरी जॅबेझच्या गोठ्यातल्या सुबत्तेला मात्र त्याची कसलीहि झळ लागत नसे.

लवकरच, देशातल्या काहीं थोड्या ऐश्वर्यसपन्न लोकात त्याचा समावेश झाला. नगराधिकाऱ्याच्या जागेसाठी त्याने उभे राहावें म्हणून लोक आग्रह करू लागले, आणि तो उभाहि राहिला. एवढें झाल्यावर अमेरिकन कॉंग्रेसच्या सीनेटसाठी त्याला उभे करावयाचें हा सर्वांच्या चर्चेचा विषय झाला. थोडक्यात सागायचे म्हणजे एखाद्या दुग्धालयातील माजरासारखे स्टोन कुटुब आता सुखासमाधानात लोळत होतें, असेंच कुणींहि म्हटले असते. आणि तसे होतेंहि. फक्त जॅबेझ स्टोन तेवढा. .

गोष्ट खरी कीं पहिली काहीं वर्षें तोहि समाधानात होता. दुर्दैवाचे

दशावतार सपतात तेव्हा ती काय सामान्य घटना म्हणायची ? माणसाच्या मस्तकात भणभणणाऱ्या कितीतरी गोष्टी ती आपल्याबरोबर घेऊन जाते. पण सहावें वर्ष उगवले, आणि जॅबेझ स्टोनच्या दृष्टीने त्याची मनःशांति सपुष्टात आली.

खालच्या मळ्याकडच्या वाटेनें, बुडावर छडी आपटीत एके दिवशीं तो पूर्वीचाच अपरिचित इसम जॅबेझ स्टोनच्या दाराशीं पुन्हा हजर झाला. हे बूट काळे व मोठे सुदर होते. पण का कोण जाणे, जॅबेझ स्टोनला ते आवडले नाहींत. विशेषतः त्याचे तळवे!

"कसे काय? मोठा छान जमीनजुमला आहे तुझा स्टोन!" तो अपरिचित इसम म्हणाला.

"अं? म्हटला तर आहे, म्हटला तरी नाहीं—" जॅबेझ स्टोन, न्यू हॅम्पशायरवाल्याच्या स्वभावाला साजेशा रीतीने उत्तरला.

"हं, आता आपल्या उद्योगशीलतेला दोष लावू नकोस. खरें काय आहे ते आपल्या दोघानाहि माहीत आहे. सारे काहीं आपल्या करार-मदाराप्रमाणे झालें. तेव्हा, येत्या वर्षी हें गहाणखत हातचे गेल्यास तुला त्याबद्दल खत बाळगण्याचे मुळींच कारण नाही."

"गहाणखत! त्याचे असे आहे . .." जॅबेझ स्टोननें बोलता बोलता जणू साहाय्याच्या याचनेने धरणीकडे व आकाशाकडे पाहिल्या-सारखे केले, आणि तो म्हणाला, "त्याचे असे आहे. माझ्या मनाशीं एकदोन शका आहेत."

"शका?" तो अपरिचित उद्गारला. या उद्गारात एक प्रकारची कटुता होती.

जॅबेझ स्टोन उत्तरला, "का? होय त्याचें असे आहे की, मी अमेरिकन नागरिक आहे. आणि त्यातहि एक धार्मिक प्रवृत्तीचा इसम आहे." असे म्हणून त्याने आपला घसा साफ केल्यासारखे केले व थोड्या अधिक धीटपणाने म्हटले, "होय महाशय! हे गहाणखत न्यायालयात टिकेल किंवा काय याविषयी मला जबरदस्त शका आहे."

"जगात कोर्टाना काहीं तोटा नाही." असा आरभ करून त्या

अपरिचितानें आपलें दात वाजविले अन् तो पुढें म्हणाला, “असे जरी असलें तरी आपले मूळचे कागदपत्र पाहायला हरकत नाही.” असे म्हणून त्याने भले लठ्ठ नोटबुक काढले. त्यात कागदच कागद होते. आपल्याशीच त्याने काही नावें पुटपुटल्यासारखी केली. “शेरविन, स्टेलर, स्टीव्हन्स, स्टोन,” आणि तो वाचून दाखवू लागला, “मी, जॅबेझ स्टोन सात वर्षांच्या मुदतीपुरता...ठीक माझ्या मतें हें अगदी ठीक आहे.”

पण जॅबेझ स्टोनच्या जणू काहीहि कानावर पडत नव्हतें. त्याचें लक्ष दुसरीकडेच लागले होते. त्या टिपणवहींतून काही तरी फडफडत बाहेर पडताना त्याने पाहिले. वाळवीसारखे दिसणारे हे काही तरी होते. पण ती वाळवी खासच नव्हती. जॅबेझ स्टोन जसा त्या वस्तूकडे टक लावून पाहू लागला, तशी ती वस्तु स्वतःच्या चिरचिऱ्या आवाजात जणू आपल्याशी बोलत असावी असे त्याला वाटले. तो आवाज लहानसाच नि क्षीण होता खरा, पण किती भयकर प्रकारचा! अगदीं माणसासारखा तो पिचलेला आवाज जॅबेझला म्हणत होता, “स्टोन, मित्रा, मला वाचव; तुला ईश्वराची शपथ आहे, मला यातून वाचव.”

पण जॅबेझ स्टोननें आपले हात अथवा पाय पसरविण्यापूर्वींच त्या अपरिचित माणसाने खिशातून झटकन् एक रगीत हातरुमाल काढला व एखादें फुलपाखरू पकडतात तशी ती वस्तु त्यात पकडली.

“माफ कर. थोडा व्यत्यय आला. काय म्हणत होतो बरें मी .?” पण एखाद्या बुजलेल्या घोड्याप्रमाणे जॅबेझ स्टोनचा देह या क्षणीं थरथरत होता. तो घसा खाकरत कसाबसा म्हणाला:

“हा तर त्या कजूष स्टीव्हन्सचा आवाज! आणि तू त्याला रुमालात पकडलेंस?”

तो अपरिचित इसम थोडा गोंधळल्यासारखा दिसला. मग तो म्हणाला, “ह जुने हिशोब...खरोखर ते चुकते करणे मोठे जिवावर येतें. पण धदा म्हणजे धदा...” अजून तो रुमाल तसाच हातात होता. रुमालाच्या कापडाची ती असहाय धडपड व फडफड पाहून जॅबेझ स्टोनला कसेसेच वाटू लागलें.

"हे सर्व इतके लहान आहेत काय?" त्यानें ओरडून विचारलें. आणि मग तो म्हणाला, "तो रुमाल आधी इथून काढून घे." त्याच्या स्वरात विनवणी व अजीजी होती. पण एवढे सारे करून जॅबेझ स्टोनला जास्तींत जास्त आणखी तीन वर्षांची मुदतवाढ मिळाली. आणि तीहि कांहीं शर्तींवर.

पण त्याचे असे आहे की, आपण जेव्हा अशा तऱ्हेचा सौदा करतो तेव्हा वर्षे किती झपाट्याने निघून जातील याची आपणाला कल्पनाहि नसते. दररोज सकाळीं जॅबेझ स्टोन जागा झाला कीं त्याच्या मनात पहिला विचार येई तो हा की, "आणखी एक रात्र सपली." झोपण्यासाठी रात्रीं जेव्हा तो बिछान्यावर लवंडे तेव्हाहि त्याच्या डोळ्यासमोर त्या जाडजूड काळ्या टिपणवहीचें व कजूष स्टीव्हन्सच्या आत्म्याचें चित्र नाचू लागे आणि मग तो हताश होई.

अखेर त्याची सारी सहनशक्ति संपुष्टात आली. आणि आपल्या कराराच्या शेवटल्या वर्षी, अगदी अखेरअखेरच्या दिवसात, एका सकाळीं त्यानें आपला घोडा बांधला व तो डॅनियल वेब्स्टरच्या शोधात निघाला. डॅनियलहि न्यू हॅम्पशायरमध्येंच जन्मले होते. क्रॉस कॉर्नर्सपासून जवळच ते राहात. शेजाऱ्यापाजाऱ्याशी त्याची जी वागणूक असे त्यात नेहमीं आस्था व अगत्य दिसून येत.

जॅबेझ मार्शफील्डला आला तेव्हा प्रातःकाळची वेळ होती. डॅनियल या वेळीं आपल्या हाताखालील शेतकामगाराना काही तरी सूचना देत होते. पण न्यू हॅम्पशायरचा कुणी तरी मनुष्य आपल्या खास भेटीसाठीं आला असल्याचे जेव्हा त्याना कळले तेव्हा सारी कामे बाजूला ठेवून मोठ्या अगत्याने ते जॅबेझची विचारपूस करायला पुढे आले. पाच माणसानाहि जड जाईल अशी न्याहारी त्यानी जॅबेझच्या पुढ्यात ठेवली. क्रॉस कॉर्नर्स येथील प्रत्येक स्त्री-पुरुषाचा जिवत इतिहास डॅनियलना मुखोद्गत होता. प्रत्येकाविषयीं त्यानी विचारपूस केली आणि शेवटीं आपण जॅबेझची कोणती सेवा करावी असे त्यानी विचारलें.

जॅबेझने सांगितलें कीं, "हा एक गहाणखताचा दावा आहे."

“गहाणखताचा दावा मीं गेली बरींच वर्षे लढविलेला नाही. तसेच अलिकडे तर मी वकिलीहि करण्याचे जवळ जवळ सोडून दिले आहे. फक्त सर्वोच्च न्यायालयापुढेच मी केस लढवितो .पण माझ्याकडून जर काही मदत होण्यासारखी असली तर ती करण्याला मी तयार आहे.”

“तसे असेल तर गेल्या दहा वर्षात पहिल्यादाच आशा दिसू लागली आहे, असे म्हटले पाहिजे.” जॅबेझ स्टोन म्हणाला व त्याने डॅनियल वेब्स्टरना तपशीलवार हकीकत सागितली.

“एकदरीत काय? मित्रा, सैतानानें मिळविलेल्या वाटेवरूनच तू चालला आहेस. पण तरीहि तुझा दावा लढवितों. भिऊ नकोस.”

डॅनियल वेब्स्टरसारख्या महान् पाहुण्याचे स्वागत करताना सबध स्टोन कुटुबाला केवढा हर्ष नि आनद झाला होता!

तो अपरिचित इसम ठरल्याप्रमाणे बरोबर मध्यरात्रीच्या ठोक्याला येऊन दाखल होणार होता. जॅबेझ व डॅनियल त्याचीच वाट पाहात बसले होते.

“वेब्स्टर, वेब्स्टर,” जॅबेझ केवढ्याने तरी ओरडला. भीति व अगतिकतेतून निर्माण होणारे धैर्य अशा समिश्र भावनाचा कप त्या आवाजात भरलेला होता. “वेब्स्टर, तुम्हाला ईश्वराची शपथ आहे. शक्य तितक्या लवकर इथून निघून जा. तुम्हीच सघराज्याचे आधार आहात. न्यू हॅम्पशायरच्या गळ्यातले ताईत तुम्ही आहात. नाही . .नाही . .त्यानें तुमच्यावर कब्जा मिळवता कामा नये.”

डॅनियल वेब्स्टरची शाति ढळली नाहीं. ते सथ आवाजात म्हणाले,

“माझा सहवास तुला आवडत नाहीं हे सागण्याचा अवसर केव्हाच निघून गेला आहे. मित्रा, तू मला किती दूर आणले आहेस हे तरी लक्षात घे.”

आणि ते असे म्हणत होते तोच बाहेरच्या दारावर कुणी तरी जोरजोरानें ठोठावत होते.

“अरे .! मित्रा तुझे घड्याळ थोडे पेड खात असावे,” असें म्हणून ते स्वतः उठले व त्यानी दरवाजा उघडला.

तोच अपरिचित इसम ! शेकोटीतल्या आगीच्या प्रकाशात तो अगदीं गहिरा आणि किती उच्च दिसला! त्याच्या काखेत एक पेटी होती. ह्या काळ्या जपानी पेटीच्या वरच्या झाकणाला छिद्रं होतीं. पेटी पाहून जॅबेझ स्टोननें भीतीनें हळू आवाजात किंकाळी फोडल्यासारखे केले व खोलीच्या कोपऱ्यात त्याने अंग चोरून घेतले. घनदाट जंगलात कोल्ह्याचे डोळे जसे लखलखतात तसे त्याचे डोळे दिसत होते.

"आपण कोण ? वेब्स्टरच्च काय ?" असे त्याने विचारले व मग तो दात विचकून हसत म्हणाला, "कायद्याचे पालन करणारा एक नागरिक म्हणून माझी मालमत्ता ताब्यात घ्यायच्या कामीं तुझी मला मदत मिळत असल्यास हवी आहे."

झाले. इथून वाद सुरू झाला मोठा कडाक्याचा आणि जळजळीत. पहिल्या प्रथम जॅबेझ स्टोनला अधुक अशी आशा वाटत होती. पण प्रत्येक नव्या मुद्द्याबरोबर डॅनियल वेब्स्टरचा पाय घसरतच चाललेला पाहून तो त्या कोपऱ्यात जणू अगदी थिजून गेला. त्याचे डोळे सारखे त्या जपानी पेटीवर खिळून राहिले होते.

गहाणखत व त्यावरील सही याविषयीं तर शंकेला जागाच नव्हती आणि हेंच तर सगळ्यात अधिक भयंकर होते. डॅनियल वेब्स्टरनीं जणू आपल्या मुद्द्याच्या समर्थनार्थ कितीदा आपली मूठ वळविली असेल, कितीदा ती उगारल्यासारखी केली असेल आणि कितीदा टेबलावर जोरजोराने आदळली असेल कोण जाणे! पण अशानें प्रश्न थोडाच सुटतो! या प्रकरणात समेट घडवून आणण्याची त्यानी तयारी दर्शविली. पण छे! परका इसम मुळीं कांहीं केल्या बधेचना.

मालमत्तेची किंमत आज वाढली आहे नि राज्याच्या सिनेटराना तरी अधिक किंमत दिली जावयास हवी वगैरेसारखे मुद्दे डॅनियल वेब्स्टरनीं कितीहि उकरून काढले असले तरी त्या गृहस्थाने कायद्यावर बोट ठेवून दिले होते. तिथून तो ढळण्यास तयार होईना. डॅनियल वेब्स्टर फार मोठे कायदेपंडित होते. कबूल! पण सर्व कायदेपंडिताचा राजा कोण हें बायबलने आम्हाला सांगितलेच आहे. निदान आज असे वाटले कीं, डॅनियल वेब्स्टरना तुल्यबल असा प्रतिस्पर्धी अखेर मिळाला.

अखेर त्या अपरिचित माणसानें जांभई दिली. आणि तो म्हणाला, "आपल्या अशिलाच्या वतीनें तू जी जोरदार वकिली केलीस ती तुला खात्रीनें भूषणावह आहे. पण हेच मुद्दे जर तू यापुढे उगाळीत बसणार असशील तर एक लक्षात ठेव. माझा वेळ फार मोलाचा आहे." बिचारा जॅबेझ स्टोन .! तो तर तिकडे थरथर कापत होता.

डॅनियल वेब्स्टरच्या भृकुटीवर जणू विजेचा आसूड उगारणारे मळभ दाटून आले. ते गरजले, "तुला वेळ मोलाचा असो वा नसो या माणसाचा तुला मुळीच ताबा मिळणार नाही. स्टोन अमेरिकेचा नागरिक आहे. आणि कुठल्याहि अमेरिकन नागरिकाला एका परक्या राजाच्या सेवेला सक्तीनें जुपता येणार नाही. या मुद्द्यावर आम्हीं एकदा इंग्लंडशीं लढाई दिली. आणि त्यासाठी फिरून एकवार घनघोर रणसंगर पेटवण्यालाहि आम्ही कमी करणार नाही."

"परकी?" त्या अपरिचित माणसानें विचारले, "कोण म्हणतो मी परकी आहे?"

डॅनियल वेब्स्टर आश्चर्यानें उत्तरले, "का बरे? सैता... . तू अमेरिकन नागरिकत्वावर हक्क सांगितल्याचे तरी कधी ऐकलेले नाही."

"असे का? खरें म्हणजे माझ्याइतका कुणाचाच या गोष्टीवर हक्क नाहीं." असे म्हणून त्या अपरिचिताने भीषण हास्य केले. "या पृथ्वीतलावर पहिली वसाहत झाल्यापासून, तुमची पुस्तकें, तुमच्या कथा, व तुमच्या समजुती यात मीच भरून राहिलेला नाही काय? मला या गोष्टीची घमेंड मारावयाची नाही. पण हे बघ, या देशात तुझ्या नावापेक्षा माझें नाव प्राचीन आहे."

"अरे वा!" डॅनियल वेब्स्टर उद्गारले. त्यांच्या कपाळावरची शीर तटतटून फुगून आली होती. मग ते म्हणाले, "असे आहे तर मग माझें घटनेला आवाहन आहे. माझ्या पक्षकाराचा रीतसर खटला चालावा असा मी आग्रह धरतो."

"सामान्य न्यायालयात हा खटला चालण्यासारखा नाहीं आणि शिवाय या घटनेला .." अपरिचिताचे डोळे थरथरत्या ज्योतीसारखे भासले.

डॅनियल वेब्स्टरनी अभिमानानें त्याला म्हटले, "अमेरिकन न्यायाधीश व अमेरिकन पञ्च एवढे जर असले तर न्यायालय कोठलेहि तुझ्या पसतीचे असले तरी माझी तयारी आहे. तत्काळ सजा वा देहात प्रायश्चित्त, काहीहि निकाल झाला तरी मी शिरसावद्य मानीन "

"पाहा बरे! तू बोलून गेला आहेस" असे म्हणून त्या अपरिचितानें दरवाज्याच्या रोखाने आपली तर्जनी वळविली. त्याबरोबर अकस्मात् चोहोकडून घोघावणाऱ्या वाऱ्याचे फूत्कार ऐकू आले. कुणाच्या तरी पावलाचाहि आवाज कानी पडला. पण, असे वाटले की, ही काहीं जिवत माणसाची पावले नव्हेत! वाऱ्याचे झोत आत येताच शेकोटीतल्या आगीतून निळ्या ज्वाळा वर उफाळल्या. दार उघडले गेले आणि एकामागोमाग एक बारा जण आत घुसले.

जॅबेझ स्टोनची यापूर्वीच भयानें नुसतीच गाळण उडाली होती; आता तर त्याच्या साऱ्या सवेदनाच बधिर झाल्या. कारण या बारा जणात वॉल्टर बटलर होता. अमेरिकन स्वातत्र्ययुद्धात तो राजनिष्ठ होता; आणि त्याने सबब मोहॉक खोऱ्यात जाळपोळीचे व दहशतीचे सत्र सुरू केले होते. पळपुटा सायमन गर्टीहि त्यात होता. त्याने माणसाना जिवत जाळले व ती जळत असताना वखवखलेल्या नजरेने पाहिले. त्याचे डोळे हिरवे होते. आणि अजूनहि त्याच्या शिकारीच्या पोशाखावर रक्ताचे डाग उठून दिसत होते. पण ते हरणाचे रक्त होते म्हणता काय? नाही! आत आलेल्यात चाचेगिरी करणारा टीच होता. त्याच्या छातीवर त्याची कुरळी दाढी रुळत होती. त्यापैकी एकूण एक देहातून नरकातली आग लवलवत होती. ते आत येत असता त्या अपरिचिताने त्यापैकी प्रत्येकाची ओळख करून दिली व प्रत्येकाच्या कर्तबगारीचा पाढा वाचला.

"वेब्स्टर, तुला ही पञ्चमडळी मान्य आहेत काय?" उपरोधिक स्वरात त्याने डॅनियल वेब्स्टरना विचारले.

डॅनियल वेब्स्टरच्या भुवयावर घामाचे बिंदू उभे राहिले. पण त्याचा आवाज पूर्वीसारखाच स्वच्छ होता.

"एकदम पसत. पण यात बेनेडिक्ट अर्नोल्ड कुठे दिसत नाहीं

ती?" (अमेरिकन स्वातन्त्र्ययुद्धात ही बाई ब्रिटिशाना सामील झाली व तिनें राष्ट्राशी द्रोह केला.—स.)

यापूर्वी काहीं काटेकोर पंचाना व खटल्यातील आरोपीना फासावर लटकविणाऱ्या कडक न्यायाधिशाना डॅनियल वेब्स्टरना तोंड द्यावें लागले होते. पण आजचा हा सच सर्वांत भयंकर होता. ही सर्व माणसे तिथे बसली असताना त्या सर्वांच्या डोळ्यात कसली तरी विलक्षण चमक झाली. आपली बाजू मांडताना त्या अपरिचिताने कसलाहि जरी आक्षेप घेतला तरी तो 'आक्षेप मान्य' व्हायचा. उलट डॅनियलनी घेतलेल्या आक्षेपाला नकार मिळायचा.

अखेर डॅनियलवर आपली ब'जू मांडण्याची पाळी आली. चिमट्या-तल्या लोखंडासारखे ते आता तापू लागले. ते विजा ओकणार होते. धिक्कार करणार होते पण जणू अंधारात खाचखळग्यात पडता पडता ते सावरले. कारण ती माणसे जॅबेझ स्टोनलाच केवळ न्यायला आली नव्हतीं, तर आपणालाहि नेण्याचा त्याचा मनसुबा होता हे डॅनियलच्या लक्षात आले. त्याच्याच शस्त्रानी जर आपण त्याच्याशी लढलों तर आपण त्याच्या कह्यात जाऊ हे त्याच्या ध्यानी आले. त्याच्या डोळ्यात पेटत असलेला क्रोध व दहशत हीं डॅनियलच्याच डोळ्यातील होतीं. तेव्हा हा क्रोध डॅनियल वेब्स्टरनी नाहीसा करावयास हवा होता—नाहीं तर ते खटला हरले असते.

मंद आवाजात त्यानी आपल्या बचावाच्या भाषणाला प्रारंभ केला. इवे तेव्हा ते पुण्यशील सत्पुरुषाच्या हृदयाच्या तारा छेडीत असत, असे म्हणतात. प्रतिपक्षाचा त्यानी धिक्कार केला नाहीं की त्याला शिव्याशाप दिले नाहींत. राष्ट्र राष्ट्र या संज्ञेला केव्हा पात्र ठरते व मानव मानवाच्या कोटीला केव्हा चढतो अशा गोष्टींविषयी ते बोलू लागले.

प्रत्येकाच्या परिचयाच्या, प्रत्येकाला जाणवलेल्या साध्या गोष्टींचाच उल्लेख करून त्यानी आपले भाषण सुरू केले. यौवनात प्रतीतीला येणारा रमणीय अशा प्रातःकाळचा तजेला, भुकेलेल्या माणसाच्या जिभेवरील अन्नाची स्वादिष्ट रुचि व मुग्ध बाल्यावस्थेत जाणवणारी दर दिवसाची नवनवता अशा अगदीं साध्यासुध्या गोष्टींचें त्यानी वर्णन केले. कुठल्याहि

माणसाला हव्याहव्याशा वाटणाऱ्या या गोष्टी होत्या. पण स्वातन्त्र्याशिवाय त्याना रुचि नव्हती. आणि जेव्हा गुलामाच्याविषयीं व गुलामगिरीच्या अनन्वित यातनाविषयीं ते बोलू लागले तेव्हा तर घंटेच्या नादासारखा त्याचा आवाज स्वच्छ खणखणीतपणे बाहेर पडू लागला.

अमेरिकेच्या सुरुवातीच्या दिवसाची व ज्यानी हे दिवस घडविले त्याची कथा त्यानी सागितली. हे गरुड-भरारी वक्तृत्व नव्हतें. पण त्याच्या शब्दानी काही तरी दिव्य दृश्य दाखविले यात काही सशय नाही. आतापर्यंत जे जे प्रमाद घडले ते ते सारे त्यानी मान्य केले. पण या प्रमादातून व सस्कृतीतून, या व्यथातून अती काही तरी नवीनच नेहमीं कसे जन्माला आले आहे तेहि त्यानी दाखवून दिले. हे सगळे घडविण्याला प्रत्येकाचा हातभार लागला होता. होय, प्रत्येकाचा! देशद्रोह्याचासुद्धा!

मग आपल्या भाषणाचा रोख त्यानी जॅबेझ स्टोनकडे वळविला. एक दुर्दैवी सामान्य मनुष्य म्हणून, हे दुर्दैव चुकवावें म्हणून धडपडणारा जॅबेझ जसा होता तसा त्यानी रगविला. आणि आज हे दुर्दैव त्याला बदलून घ्यावयाचे होते म्हणून तो चिरकाल सजा भोगीत राहणार होता. माणसाच्या जन्माला येण्यात दुःख आहे हे खरे, पण ती एक अभिमानाचीहि गोष्ट आहे—हे त्यानी सागितले. नरकातसुद्धा माणूस माणसासारखा वागला तर या गोष्टीचा अनुभव येईल.

आणि आता ते कुठल्याहि एका माणसाची वकिली करीत नव्हते. सबध मानवजातीच्या पदरी आलेले अपयश आणि त्या मानवजातीचा अनत काळपर्यंत चाललेला प्रवास याची कथा त्यानी सागितली. एक महान् यात्रा होती ती. फक्त मानवानेच तिचे मर्मग्रहण केले. कुठल्याहि दानवाला ते कळले नसते.

शेकोटीतील आग विझू लागली होती. आता पहाटेचे गार वारे वाहू लागले. डॅनियल वेब्स्टरनी आपले भाषण सपविले तेव्हा खोलीतील प्रकाश धूसर होऊ लागला होता. भाषणाच्या शेवटी ते न्यू हॅम्पशायरच्या भूमीकडे वळले. प्रत्येक माणसाचे हे प्रीतिनिधान होते. हे चित्र त्यानीं रगविले आणि ज्यूरींतील प्रत्येक गृहस्थाला त्यानी अनेक विस्मृत गोष्टींचें स्मरण करून दिले.

त्याचा आवाज हृदयाच्या गाभ्यापर्यंत जाऊन भिडे. ही एक ईश्वरी देणगी होती. आणि हेच त्याचे सामर्थ्यहि होतें. तेथे जमलेल्यापैकी एकाला त्याचा आवाज निबिड अरण्यासारखा व त्यातील रहस्यासारखा वाटला. दुसऱ्याला त्यात सागराचें गाभीर्य व त्यावर थैमान घालणाऱ्या वादळाचे रौद्ररूप प्रतीत झाले. तिसऱ्याच्या कानात या भाषणानें त्याच्या हरपत्या राष्ट्राचे श्रेय ओतले. चौथ्याला एका जुन्या निरागस प्रसगाची जाणीव करून देऊन कित्येक वर्षे झोपलेल्या त्याच्या स्मृतीला जाग आगली. प्रत्येकाला काहीं ना काही दिसले. जेव्हा डॅनियल वेब्स्टरनी आपले भाषण सपविले, तेव्हा अर्थात् जॅबेझ स्टोनचा निरपराधीपणा आपण शाबीत करू शकला किंवा काय हे त्याना माहीत नव्हते. पण आपण आज काहीतरी चमत्कार घडवून आणला आहे असा मात्र त्याचा विश्वास होता. कारण त्यानी पाहिले तो न्यायाधिशाच्या व पचाच्या डोळ्यातील ती लकाकी नाहीशी झाली होती आणि या क्षणाला तीं फक्त माणसे राहिली होतीं—होय ! माणसासारखी माणसे !

पचातील वॉल्टर बटलर उभा राहिला. त्याच्या मुद्रेवर कसला तरी गहिरा, हृमग अभिमान विलसत होता. तो म्हणाला, "पचानी पूर्ण विचारान्ती आपला निर्णय घेतला आहे " असे म्हणता म्हणता त्यान सरळ त्या अपरिचिताच्या दृष्टीला दृष्टि भिडविली व सांगितले, "आरोपी जॅबेझ स्टोन याच्या बाजूने आम्ही निवाडा देत आहोत "

हे वाक्य ऐकताच त्या अपरिचिताच्या चेहऱ्यावरचे हास्य एकदम कुठल्याकुठे विरघळले. पण वॉल्टर बटलर न डरता निर्धाराने म्हणाला, "आमच्या हाताशी असलेल्या पुराव्याला धरून आम्ही काटेकोरपणे निर्णय केलेला नाहीं हेहि कदाचित् शक्य आहे. पण वेब्स्टरनी आज जे भाषण केले त्याला शहरपित्यानीसुद्धा वदना द्यावयाला हरकत नाही."

इतक्यात कोंबडा आरवला. ती बाग प्रभातकाळच्या धूसर आकाशाला छेदून जणू आरपार गेली. निमिषार्धात न्यायाधिशासकट सर्व पंचमडळी धुरासारखी खोलीतून एकदम कुठे नाहीशी झाली. जणू काही हे सारेजण या खोलीत कधी नव्हतेच. त्या अपरिचिताच्या मुद्रेवर विषण्ण हास्य उमटले. मग डॅनियल त्याला म्हणाले,

" तुझी ना नसल्यास ते कागदपत्र मला आधीं हवे आहेत. " ते हातात येताच त्यानीं ते टरकन् फाडून टाकून त्याचे चार तुकडे केले. या कागदात कसली तरी वेगळीच ऊब भरून राहिली होती. मग ते त्याला म्हणाले, " आता तुझा कब्जा घ्यायचा आहे. " म्हणता म्हणता त्या अपरिचिताच्या दंडावर त्याच्या पंज्याची अस्वलाच्या सापळ्यासारखी घट्ट पकड बसली.

त्याच्या या मगरमिठींतून सुटण्यासाठी त्या अपरिचितानें कमालीची धडपड केली. पण व्यर्थ! मग तो क्षीण फिकट हास्य करीत डॅनियलना विनवू लागला, " अरे..... अरे हें काय! सोड ना मला! हे वावगे कृत्य आहे. आता दावा खर्चासहित निकालात निघाला पाहिजे असा जर तुझा आग्रह असेल तर ते पैसे भरण्याला माझी केव्हाहि तयारी आहे."

" काय मेहरबानी करणार आहेस? भरावेच लागतील!" डॅनियलनीं निक्षून सांगितले. असे म्हणताना त्यानी त्याला असे काहीं गदगदा हालविले कीं बिचाऱ्याचे दात कडकड वाजू लागले आणि मग ते म्हणाले, " जॅबेझ स्टोनलाच काय, पण त्याच्या वारसाना वा त्यानें मुखत्यारी दिलेल्या इतर कुणालाहि——इतकेच काय पण न्यू हॅम्पशायरमधील अन्य कोणाहि माणसाला——जगाच्या अंतापर्यंत तुझ्याकडून कसलीहि इजा होणार नाही, असे टेबलापाशी बसून तुला लिहून द्यावें लागेल. या राज्यात आम्हाला मृतात्म्यासाठीं एखादे निवासस्थान उभारायचें झाल्यास तें आमचें आम्ही उभारू. त्यासाठीं परकी इसमाच्या मदतीची आम्हाला मुळींच गरज नाहीं. समजलास काय?"

त्या अपरिचितानें डॅनियलच्या आज्ञेप्रमाणे नवे कागदपत्र लिहून त्यावर आपली सही केली. तो हे लिहीत असता डॅनियलनीं आपला हात त्याच्या कोटाच्या कॉलरवर ठेवून दिला होता.

लिहून झाल्यावर त्या अपरिचितानें अजीजीनें विचारलें, " आता तरी मला जाऊ देशील?"

" जाऊ देऊ...? तुला...?" असे म्हणत असता डॅनियलनीं पुन्हा एकदा त्याला गदगदा हलविलें. " तुझी कशी काय विल्हेवाट लावायची

त्याचा अजून मी विचार करतो आहे. तुझी माझ्याशी गाठ आहे. मला वाटते, मी तुला मार्शफील्डला न्यावे. कसे? माझा प्रिय गोलिॲथ नावाचा एक मेंढा आहे. तो लोखंडी दारानाहि धडका देतो. तेव्हा त्याच्या कुरणातच तुला मोकळा सोडतो. पाहू या तो काय करतो ते!''

हें ऐकताच त्या अपरिचिताच्या तोंडचे तर पाणीच पळाले. अगदी काकुळतीला येऊन तो डॅनियलच्या हातापाया पडू लागला. अखेरीस डॅनियल मूळचेच दयाळू असल्याने त्याला सोडून देण्यास त्यांनी मान्यता दिली.

डॅनियलच्या दयाळूपणाबद्दलची कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी अपरिचिताने त्यांचा हात पाहून भविष्य सांगण्याची तयारी दर्शविली. सामान्यतः डॅनियलना ज्योतिष्याविषयी फारशी आस्था वाटत नसे. पण हा अपरिचित इसम वेगळ्या जातींतला असल्याने ते कबूल झाले.

त्या अपरिचिताने डॅनियलच्या हातावरील रेषानरेषांचे रहस्य शोधण्याचा प्रयत्न चालविला होता

"तुझी महत्त्वाकांक्षा जवळजवळ सफल होईल. पण . ती सिद्धीस जाणार नाहीं तुझ्यापेक्षा कमी प्रतीचे लोक अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष होतील पण तुझ्याकडे त्यांचे दुर्लक्ष होईल.''

"काही हरकत नाहीं'' डॅनियल वेब्स्टर म्हणाले. "आणि मी जरी राष्ट्राध्यक्ष झालों तरी डॅनियल वेब्स्टरच राहीन .पुढें?''

मग डॅनियलनीच त्याला विचारले, "थांब, एक प्रश्न आहे माझी सबंध हयात मी संघराज्याच्या प्रतिष्ठापनेसाठीं लढलो. ज्यांना या संघराज्याच्या चिंधड्या उडवावयाच्या आहेत, त्यांच्याविरुद्ध या लढ्यात आम्ही यशस्वी होऊ शकू काय?''

"तुझ्या हयातीत तरी नाही. पण अर्ती यश मिळेल. तुझ्या मृत्यूनतर तुझ्या ध्येयाची पताका घेऊन सहस्रावधि लोक तुझे कार्य उचलून धरतील. तू जे शब्द बोललास ते शब्द त्यांना उत्स्फूर्त करीत राहतील.'

"खरें? मग, फुगलेल्या लांब नळकांड्यासारखा असलेला चपट्या दगडासारख्या देहाचा, उतरलेल्या खांद्याचा तू ज्योतिषीच रे असा

कसा ?" हास्य गर्जवीत त्यानी विचारले. 'चल, निघ येथून, माझी मुद्रा तुझ्या अंगावर उमटविण्यापूर्वीच चालता हो कसा! संघराज्यातील मूळच्या तेरा राज्याची शपथ घेऊन मी सांगतो की संघराज्याचे संरक्षण करण्यासाठी मी नरकातसुद्धा जाईन "

आणि असे म्हणून लाथ हाणण्यासाठी ते किंचित् मागे सरले ही लाथ बसती तर एखादा घोटासुद्धा दिव्हळला असता. तथापि त्या अपरिचिताला डॅनियलच्या बुटाचे टोक तेवढे चाटून गेले पण तेवढ्यानेहि तो कारेतल्या आपल्या पेटीसहित असा झेलपटत उडून गेला की सांगता सोय नाही.

लोक असे सांगतात की, त्यानंतर काही कधी तो इसम न्यू हॅम्पशायर राज्यात पुन्हा म्हणून दिसला नाही

ᨀ ᨀ ᨀ

# ९. सूर्याचें वरदान

## अमेरिकन लोककथा

फार प्राचीन काळची कथा. त्यावेळीं युद्ध नव्हतीं, आणि टोळीवाल्याच्या प्रदेशात पुरेपूर शातता होती. तेथे एक सुदर युवती होती. इतकी कीं अनेक लोक तिच्याशी लग्न करण्यासाठी हपापलेले होते. तिच्यावर फिदा असलेला प्रत्येक पुरुष तिच्याकडे जाई आणि विवाहाची इच्छा प्रदर्शित करी. पण 'मला कर्तव्य नाहीं' असें सागून ती स्पष्ट नकार देई. असे कितीतरी नकार पाहिल्यावर तिचे पिताजी तिच्यावर भडकले आणि एकदा म्हणाले, "काय चालविले आहेस हे तू? चागले नवरदेव येऊन मागणी घालतात आणि तू नकार देतेस! मला वाटतें, तुझे कुणावर तरी प्रेम आहे."

"तसें नाहीं पिताजी, माझे कुणावरहि प्रेम नाहीं. माझे म्हणणें तरी ऐका! सूर्यदेवानें मला सागितले आहे, 'आताच तू लग्न करू नकोस, कारण तू फक्त माझीच आहेच. सध्या तू अविवाहित राहिलीस तरच सुखी होशील.'"

"अस्से काय?" पिताजी एकदम समजसपणें म्हणाले. "तर मग ठीक आहे. काहीं हरकत नाहीं." मग या प्रश्नावर ते काहींच बोलले नाहींत.

परंतु एक युवक मात्र नदीच्या तीरावर बसून होता. तो जवान होता तसा देखणाहि होता. फक्त त्याच्या गालावर तेवढा एक व्रण होता. त्याच्याबद्दल आणखी सांगायचें म्हणजे तो गरीब होता. नदीच्या तीरावर तो वाट पाहात बसला होता. कारण तेथें पाणी भरण्यासाठी बायका येत असत.

ती युवती त्याच्या दृष्टीस पडताच तो एकदम तेथें धावला आणि म्हणाला, "थांब, मला तुझ्याशीं कांहीं बोलायचें आहे."

"हं, काय आहे?" ती युवती म्हणाली.

"अनेक धनवंतांनाहि तू नकार दिला आहेस. आणि मी तर गरीब आहें—अगदी गरीब. मला घरदार नाहीं. अन्नपाण्याची आणि कपड्यालत्त्याची सोय नाहीं. मला नात्यागोत्याचीं माणसें नाहींत. कारण सगळीं परमेश्वराघरीं गेलीं आहेत. तरीहि मी तुला मागणी घालतो आहे. कृपा कर आणि माझी पत्नी हो."

त्या गरीब युवकाच्या नम्र स्वभावाचा त्या युवतीच्या मनावर चांगला परिणाम झाला असावा. कारण थोडासा विचार करून ती म्हणाली, "धनवान् अशा तरुणांना मीं नकार दिला हे खरें आहे. आणि असें असूनहि एक गरीब युवक मला मागणी घालतो आहे हे पाहून मला आनंद झाला आहे—अगदी चमत्कारिक आनंद! कदाचित् मी तुझी पत्नी होईनहि. माझे पिताजी तुला कपडे देतील, तुझी सगळी सोय करतील, तुला गरिबीतून वर आणतील."

त्या क्षणींच त्या युवकाचें हृदय आनंदानें ओतप्रोत भरलें. मन उचंबळून आलें. पण तेवढ्यात ती तरुणी म्हणाली, "थांब, सूर्यदेवाचा मला साक्षात्कार झाला आहे. मी लग्न करूं नये असें त्याचें म्हणणें आहे. मी सूर्यदेवाच्या आधीन आहे. म्हणून तू सूर्यदेवापाशीं जा. आणि त्याला सांग, 'जिला तू साक्षात्कार घडविला आहेस ती तुझा शब्द पडूं देणार नाहीं. परंतु आता तिला लग्न करायचें आहे. ती माझी पत्नी व्हावी, अशी माझी इच्छा आहे.' माझ्या लग्नाला सूर्यदेवाची पसंती असली तर त्याला म्हणावें तुझ्या गालावरचा व्रण नाहींसा कर. तुझ्या

गालावरचा वण मला दिसला नाही म्हणजे सूर्यदेवांची मान्यता आहे असं मी समजेन. सूर्यदेवाने तुला नकार दिला किंवा सूर्यदेवाचे निवासस्थान तुला गाठता आले नाही तर तू माझ्यासमोर कधीहि येता कामा नये.'

“हाय रे कर्मा!” तो युवक कपाळावर हात मारात ओरडला, “तुझे पहिले शब्द किती गोड होते. पण आता मात्र माझ्या हृदयावर तू प्रहार केलास.” अगदी विषण्ण आवाजात तो पुढे म्हणाला, “सूर्य-देवाचे घर किती दूर दूर असेल. कुठे आहे ते? तिथे जाण्याचा मार्ग कुठला! त्या मार्गाने आजवर कोणी गेलेला नसेल!”

“धीर धर!” ती युवती म्हणाली आणि ती निघून गेली

अखेर त्या तरुण युवकाने धीर केला. सारे बळ त्याने एकवटले आणि सूर्याकडे जाण्याची तयारी केली उंच कड्यावर चढून तो उभा राहिला आणि त्याने एकदा मागे वळून त्या युवतीच्या निवासस्थानावर कटाक्ष टाकला. जाता जाता त्याच्या मनात विचार आला, 'आता यापुढे आपल्या हृदयाची राणी आपल्या नजरेस पडेल की नाही कोण जाणे!'

“सूर्यदेवा, हात जोडतो—कृपा करा” असे म्हणून त्याने प्रार्थना केली, आणि सूर्याच्या निवासस्थानाकडे जाणारा रस्ता शोधण्यासाठी तो पुढे निघाला

अनेक दिवस लोटले, तो युवक सारखा प्रवास करीत होता. लांबच लांब माळावरून गवत तुडवीत तो जात होता, सारखा चालत होता. डोंगर-पर्वत चढला, नद्या ओलांडून गेला, तरी सूर्यदेवाचे घर त्याला गवसत नव्हते. फक्त दिवसेंदिवस त्याच्या खाकोटीतली शिदोरी मात्र खतम होत चालली होती.

सूर्यदेवाच्या घराची चौकशी करीत तो युवक पुढे चालला वाटेत जो जो भेटेल त्याच्याकडे चौकशी करीत तो मार्ग आक्रमीत होता. वाटेत त्याने कोल्ह्याला विचारले, अस्वलाला विचारले, पण सूर्याचे घर कुठे आहे ते कुणासच माहीत नव्हते. सर्वांनी नकारार्थी माना हलविल्या. पण एक लांडगी मात्र पुढे आली आणि म्हणाली, “त्या तिथे—पलीकडे राहतो सूर्य!”

त्या दिशेनें जाता जाता तो युवक एका भव्य आणि प्रचंड सरोवरापाशीं आला. सरोवराच्या तीराशी उभा राहून त्याने दूरवर नजर फेकली. त्या सरोवराला कुठें शेवटच नव्हता. त्या सरोवराच्या पलीकडे सूर्याचें घर आहे--पण तिथे आता पोंचायचें तरी कसे? सरोवराचा दुसरा काठ तर नजरेच्या टप्प्यातहि येत नाही! तो युवक पुनः एकदा हतबल झाला. त्याची गात्रे गळू लागली. हृदयाचे ठोके बंद पडताहेत असें त्याला वाटू लागलें.

क्षणभर त्याला कांहींच सुचेना. विषण्ण मनःस्थितींत तो तसाच उभा राहिला. अगतिक होऊन त्याने पाण्यावर नजर स्थिर केली. तेवढ्यात दोन हंस डौलाने पोहत तेथे आले ते त्या युवकाला पाहून म्हणाले, "येथे तू कशासाठी आला आहेस?"

"मरायला!" तो युवक वैतागानें म्हणाला. "सूर्यदेवाचें घर शोधीत मी इथे आलो आहे. येथून अति दूर माझा देश आहे. तेथे एक सुंदर युवती आहे. तिच्यावर माझें प्रेम आहे—तिच्याशी मला लग्न करायचें आहे. पण ती सूर्यदेवाच्या वचनात आहे. तिच्यासाठीं मला सूर्यदेवाची पसंती मिळवावयाची आहे. कित्येक दिवस मी भ्रमण करतो आहे. आता मी अशा पेचात आहे की, परत तर फिरता येत नाहीं आणि हें सरोवरहि पार होता येत नाही. म्हणून म्हणतों आता जीव देण्याशिवाय गत्यंतर नाहीं."

"छे! छे! असा व्यर्थ मरू नकोस!" ते हंस माना डोलवीत म्हणाले. "या सरोवराच्या पलीकडें सूर्याचें घर आहे. आम्ही तुला तिथें नेऊं."

त्या हंसानीं त्या युवकाला आपल्या पाठीवर बसवलें आणि ते सरोवरच्या दुसऱ्या तीराकडे वेगानें निघाले. तीरापाशी येताच ते हंस म्हणाले, "हं उतर इथें. आणि त्या समोरच्या रस्त्याने पुढें जा. अगदी हाकेच्या अंतरावर तुला सूर्यदेवाचें घर सापडेल."

त्या रस्त्यानें तो युवक निघाला. उत्कंठेनें आणि आनंदानें त्याचे हृदय हलकें झालें होतें. जाता जाता त्याला वाटेत एक पाथस्थ भेटला. तो

जवान आणि सुदर होता. त्यानें त्या युवकास प्रश्न केला, "वाटेंत तुला काहीं शस्त्रे आढळली काय?"

"होय" तो युवक म्हणाला, "काहीं शस्त्रे मीं पाहिली."

"त्याना तू हात नाहीं लावलास?"

"नाहीं. ती माझी नव्हतीं. मग मी हात का लावू?"

"शाब्बास! मोठा प्रामाणिक आहेस!" तो पायस्थ म्हणाला. "बरें, पण चाललास कुठे?"

"सूर्यदेवाकडे."

"माझे नाव शनि. सूर्यदेव माझे पिताजी. ते कामावरून दिवसाअखेर परत आले म्हणजे तुला भेटता येईल."

बोलता बोलता ते सूर्याघरी आले. बाहेर काहीं ग्रह, चद्र व सूर्याची पत्नी बसली होती. तिने त्या युवकाचे स्वागत केले आणि श्रमपरिहारासाठीं त्याला भोजन वाढले.

दिवसाअखेर सूर्य घरी आला. त्याला भेटण्यासाठी एक युवक आला आहे व तो प्रामाणिक आहे असे शनीने सूर्याला सागितले. तेव्हा सूर्य त्या युवकाला म्हणाला, "तुझ्या आगमनाने मला आनद झाला आहे. तू इथे रहा—अगदी वाटेल तितके दिवस. शनि आहेच तुला मित्र म्हणून."

"शनीबरोबर जा आणि हवें तिथे फिरून ये." चद्राने त्या युवकाला सागितले. पण चद्र लागलीच पुढे म्हणाला, "आणि हें पाहा, त्या सरोवराकडे मात्र जाऊ नका हो. तिथे भयकर पक्षी राहतात. ते खाऊन टाकतील तुला."

चंद्राकडून हा इशारा मिळताच तो युवक शक्य तों त्या सरोवरापासून दूर राहिला आणि त्यानें शनीलाहि दूर ठेवले. परतु एके दिवशी मात्र ते त्या सरोवरापाशी आले आणि हिंसक पक्षी त्याच्या दृष्टीस पडले.

ते पक्षी पाहताच शनि म्हणाला, "चल, चल, आपण त्या पक्ष्याना ठार मारू या."

"छे–छे," तो युवक म्हणाला, "आपण तिथे न जाणें बरें."

पण शनि पडला नाही. तो सरोवराकडे धावला. पक्षी शनीला मारतील म्हणून तो युवकहि शनिमागोमाग धावत गेला. पक्ष्याची आणि शनीची झटापट सुरू होताच तो युवक झोयाने पुढे झाला आणि आपल्या भाल्याच्या साहाय्याने त्याने पक्ष्याना ठार केले.

शनीला पक्ष्यांच्या तावडीतून वाचविल्याबद्दल शनीची माता उपकृत झाली. सूर्यदेवाच्याहि ही हकीकत कळताच त्यालाहि आनंद झाला सूर्य त्या युवकास म्हणाला, "बाळा, तुझी कामगिरी मी कधीहि विसरणार नाही. आता तुला काय हवे ते बोल."

"कृपा करा," तो युवक म्हणाला "महाराज, आपल्यापाशी माझे एक मागणे आहे. मला ज्या युवतीशी लग्न करायचे आहे ती युवती तुमच्या वचनात आहे. आणि तुम्हीं तर तिला लग्न न करण्याचा आदेश दिला आहे."

"तू म्हणतोस ते खरे आहे," सूर्य म्हणाला. "ती युवती फार चांगली आहे. तिला, तिच्या पतीला आणि बाळाना दीर्घायुष्य लाभेल."

त्यानंतर सूर्याने त्या युवकाला आकाशाच्या कठड्यावर नेले आणि वरून सबंध जगाचे दर्शन घडविले. आकाशातून त्याने वाटोळ्या पृथ्वीवरील सपाट जग पाहिले.

पुढे सूर्य त्या युवकाला म्हणाला, "तू जेव्हा आता परत जगावर जाशील तेव्हा तेथील लोकासाठी एक संदेश घेऊन जा.—एखादा माणूस आजारी पडला किंवा संकटात सापडला तरी त्याच्या पत्नीने असा नवस करावा की, तो माणूस रोगमुक्त किंवा संकटमुक्त झाला म्हणजे ती माझे मंदिर बांधील. जर ती पत्नी पवित्र व प्रामाणिक असली तर मी खूष होईन आणि तिच्या नवसाला पावेन. पण जर ती बाई पवित्र आणि प्रामाणिक नसेल तर मात्र तिच्यावर कोप होईल. तूहि माझे मंदिर बांधले पाहिजे. हे मंदिर पृथ्वीसारखे वाटोळे बांधले पाहिजे. पण त्याहिपूर्वी तू शभर काठ्यांचे एक श्रममंदिर बांध. ते आकाशासारखे अर्धगोलात्मक बांध. त्याच्या अर्ध्यावर लाल रंग दे. तो भाग म्हणजे माझे प्रतीक. दुसरा अर्धा भाग काळा ठेव. तो भाग म्हणजे रात्र."

एवढे सांगितल्यानंतर सूर्यानें एक जालीम औषध घेऊन त्या युवकाच्या गालावरील व्रण नाहीसा केला.

अखेर युवक सूर्यदेवाची आज्ञा शिरसावंद्य मानून पृथ्वीवर जाण्यास निघाला. त्यापूर्वी चंद्रानें आणि शनीनें त्या युवकास अनेक वस्तु भेटी दाखल दिल्या. त्यानंतर त्या दोघांनींहि युवकास निरोप दिला. सूर्यानें त्याला पृथ्वीवर आकाशगंगेच्या वाटेनें जाणारा आडमार्ग दाखविला. त्या मार्गानें निघून तो युवक पृथ्वीवर पोंचला.

आपल्या गांवीं जाऊन त्या युवकानें गाठोड्यातील आपली भरजरी वस्त्रं आणि किंमती अलंकार दाखविले. त्याच्या अंगावरहि सुंदर वस्त्रें होतीं. धनुष्य, ढाल वगैरे अनेक चित्रविचित्र शस्त्रेंहि त्यानें सोबत आणली होतीं. ती सारी ऐट आणि तो थाट पाहून लोक चकित झाले. 'तो हा गरीब पोर' यावर कुणाचा विश्वासच बसेना. पण चेहरा ओळखीचाच दिसत होता. हां हां म्हणता ती बातमी गांवभर पसरली. 'गालावर व्रण असलेला तो गरीब पोर परत आला आहे, पण आता तो गरीब राहिलेला नाहीं" असे जो तो म्हणू लागला.

ती बातमी मिळताच ती सुंदर युवती पुढं आली. त्यानें सूर्यानें दिलेली ससाण्याची पिसें तिच्यापाशीं दिलीं व म्हटलें, "तुझ्यावर संतुष्ट होऊन सूर्यदेवानें हीं पिसें तुला दिलीं आहेत." तें ऐकून ती युवती हर्षित झाली. पुढें त्या दोघांनीं मोठ्या थाटानें विवाह केला. सूर्यानें त्यांना दीर्घायुष्य दिलें. त्यांच्या हयातींत त्या दोघांनाहि कधीं आजाराची बाधा झाली नाहीं.

दिवसामागून दिवस गेले. त्यांना मुलेंबाळें झालीं आणि कालगतीमुळें त्यांच्यावर वार्धक्याची छाया पसरू लागली.

एके दिवशीं सकाळीं तीं दोघेंहि उठलीं नाहींत. तेव्हा त्यांचीं मुलें त्यांना उठवूं लागलीं.

—पण तीं दोघेंहि उठलीं नाहींत. रात्रीं झोपेंतच त्यांचें शांतपणें निधन झालें. कोणत्याहि प्रकारचा त्रास न होतां त्यांनीं इहलोकाची यात्रा संपविली.

⁂ ⁂ ⁂